


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, मार्च, जून, ऑक्टोबर )

**संपादन-समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्नसन

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११००४ ( फोन ५९२५८ )

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १/८ आगरकर नगर, पुणे ४११००१ (फोन २३४९६, शिवाय फोन ५४०६९)

पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर / आवरणपृष्ठ तीन पहा.

पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

---

संपादक : अशोक रा. केळकर / प्रकाशक : प्र. ना. परांजपे, मराठी अभ्यास परिषदेसाठी / मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, ४६१/४ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

संपादकीय

# जिती जागती वाट पाहणारी

स्तेफान मालार्मे ( १८४२–९८ ) या फ्रेंच कवीने आपल्या एका कथेत एका खोलीत मध्यभागी एका टेबलावर एक पुस्तक उघडे पडले आहे आणि आजूबाजूला कोणीच नाही असे वर्णन केले आहे. नाहीतरी कोणत्याही पुस्तकाची स्थिती कोणी येऊन ते पुस्तक वाचू लागेपर्यंत यापेक्षा फारशी वेगळी नसते.

पुस्तक ही वस्तू नसते. टेबलावर, ग्रथालयाच्या शेल्फावर, दुकानाच्या खिडकीत वाचकांची वाट पाहणारी पुस्तके तुम्ही पाहिली आहेत का? झॉर्झ पुले या फ्रेंच विचारवंताने ती पाहिली आहेत. मालार्मेच्या कथेचा हवाला देऊन तो म्हणतो, की अशी पुस्तके पाहून मला आठवण होते ती छोट्या पिंजऱ्यातून विकायला मांडलेल्या पशुपक्ष्यांची, कोणी आपल्याला विकत घेईल या आशेवर ते प्राणी जगत असतात. जिवंत प्राण्याला वस्तूसारखे लेखले जावे यापेक्षा लाजिरवाणी स्थिती कोणती? कागद आणि शाई यांपासून बनलेली, कुठेही पडून असलेली पुस्तके देखील अशीच नाहीत का? माणूस पुस्तकात लक्ष घालतो आणि या साध्या वाटणाऱ्या कृतीमुळे पुस्तकाचे अवघे असतेपण उजळून जाते. अशा या पुस्तकाची हाक अव्हेरणे मला तरी अवघड जाते. कोण म्हणतो पुस्तक ही केवळ जड वस्तू आहे!

जी स्थिती मिटून राहिलेल्या पुस्तकाची तीच स्थिती डबाबंद झालेल्या फिल्मची. आज भारतात कितीतरी चित्रपटांची रिळे डबाबंद होऊन पडली आहेत. अशा बिचाऱ्या चित्रपटांत मराठी भाषेतल्या चित्रपटांची लोकसंख्या बऱ्यापैकी आहे. डबाबंद चित्रपटांची कोंडी फोडणे इतके सोपे नाही, ते खर्चाचे काम आहे. चित्रपटगृह उपलब्ध असणे, प्रेक्षक उपलब्ध होतील याबद्दल चित्रपट-प्रदर्शक आणि चित्रपट-वितरक यांना विश्वास वाटणे, परस्परांना छेद देणाऱ्या हितसंबंधांचा गुंता उकलणे अशा अनेक बाबी त्यात गुंतलेल्या आहेत.

मिटून पडलेले पुस्तक उघडून वाचणे ही तुलनेने सोपी गोष्ट आहे. म्हणजे चित्रपटांच्या तुलनेने. एरव्ही त्यातही गुंता आहेच. वाचक साक्षर असणे, त्याला वाचायला फुरसत आणि निवांत कोपरा मिळणे, वाचक उपलब्ध होतील याबद्दल वाचनालयांचे चालक आणि पुस्तकविक्रेते यांना भरवसा वाटणे अशासारखे प्रश्न याही ठिकाणी आहेत. पण या व्यावहारिक प्रश्नांच्या पलीकडे एक अधिक निसटता प्रश्न आहे. वाचक पुस्तक उघडायची कृती करायला का प्रवृत्त होतो? आणि कधीकधी उघडलेले पुस्तक फटकन मिटायची बुद्धी त्याला का होते? पुस्तकाच्या जीवनाचे सार्थक होते ते पुस्तक विकत जाण्यामुळे नाही. पुस्तक ( विक्रेत्यांच्या बोलीत) 'उचलले' जाण्यामुळेही नाही. तर पुस्तकाला त्याचा वाचक मिळून दोघांमध्ये संज्ञापन प्रस्थापित होण्यामध्ये पुस्तकाच्या जीवनाचे सार्थक आहे.

मालार्मेची कथा जशी पुलेला फळली तशी ती तुम्हाआम्हाला सफळ संपूर्ण होऊ दे!

**अशोक रा. केळकर**

# मराठी भाषा अने मराठीभाषको साथेनी मारी मैत्री

## गुलाबदास ब्रोकर

गेली साठ-पासष्ट वर्षे मी मुंबई शहरात राहात आहे. माझे आजोबा-पणजोबा त्याही पूर्वीपासून मुंबईतच राहायचे. तेव्हा मी मुंबईकरच म्हणायचा.

माझ्याप्रमाणेच लक्षावधी गुजराती-भाषक माणसे गेली कित्येक वर्षे मुंबईत राहात आहेत. तसेच लक्षावधी मराठी-भाषक लोक तर येथीलच रहिवासी आहेत. हिंदी-भाषक लोकांची वस्ती पण बरीच आहे. त्याचप्रमाणे इतर भाषा बोलणारे लोकसुद्धा मुंबईला स्वतःचेच गाव समजतात.

ह्या मुंबईत जसे विविधभाषाभाषी लोक राहतात तसेच विविधधर्मी लोकपण वर्षानुवर्षे राहात आहेत. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, जरथुष्ट्री, यहुदी, जैन—अशा अनेक धर्मांच्या अनुयायांचे हे जन्मस्थान व वसतिस्थान आहे. त्यातूनही जरथुष्ट्राचे अनुयायी अशा पारशी लोकांचे तर हे मुख्य वसतिस्थान आहे.

आणि तरीही भौगोलिक दृष्टींनी मुंबई जसे एक बेट आहे, तसे इतके धर्म आणि इतक्या भाषा बोलणारे लोक सामावून घेणारे हे शहर, एक नव्हे अनेक बेटांमधे जणू काही विभागले गेले असावेसे वाटते. हिंदूंची मुंबई, मुसलमानांची मुंबई, पारश्यांची, ख्रिस्ती लोकांची, यहुद्यांची—त्यातही पुन्हा मराठी, गुजराती, हिन्दी, कोकणी, इंग्रजी भाषा बोलणारे पोटविभाग—कोणास ठाऊक अशी किती शहरं ह्या एका शहरात आहेत. हे सर्व भिन्नभिन्न-भाषाभाषी आणि भिन्नभिन्नधर्मी लोक अनेक वेळा अनेक स्थळी भेटतात. एकमेकांत मिसळतात. एकमेकांशी व्यवहार करतात, व्यापार करतात, शिक्षणाची देवाण-घेवाण करतात. राजकीय चळवळीत एकत्र येतात तरीही मूलतः ही सर्व माणसे वेगवेगळीच राहातात.

येथे राहणाऱ्या हिंदूंपैकी बहुतांश लोकांचे अन्यभाषक व अन्यधर्मी लोकांशी जिव्हाळ्याचे, घरोब्याचे संबंध क्वचितच असतील. तीच गत मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, आणि यहुदी यांची. एकमेकांच्या बरोबर राहूनही सर्व एकमेकांपासून वेगळे. अगदी एकाच खोलीत, अगदी जवळजवळच्या पलंगावर नेहमी झोपणारे बहुसंख्य पतिपत्नी जसे एकमेकांपासून निराळे असतात तसेच.

अशा ह्या अनेक बेटांमधे विभागल्या गेलेल्या महानगरात वर्षानुवर्षे राहात असूनही





अनुक्रमणिका

रात्रंदिवस गुरफटलेलो असतो माझ्या मायबोली गुजराती भाषेने आणि बहुतांशी इंग्रजी भाषेने, पण माझ्या अवतीभवती मराठी भाषा पसरलेली आहे आणि माझ्या कानांवर ती नेहमी पडत असते. वेळ आल्यास मी पण दोन-चार मराठी वाक्ये खऱ्याखोट्या व्याकरणानिशी बोलतो, तरी पण बहुधा तिच्यापासून अलिप्तच राहातो. आत्ता पण—तसाच राहतो आणि पूर्वी पण तसाच राहायचा.

वास्तविक पाहता मराठी-भाषकांच्या सहवासात मी काही कमी वेळा आलो नव्हतो. कॉलेजात अर्धेअधिक विद्यार्थी मराठी-भाषक होते, अर्ध्याहून अधिक प्राध्यापक पण मराठीभाषक. त्यात डॉ. गजेन्द्रगडकर तर कायम लक्षात राहातील असे होते. पण ते शिकवायचे संस्कृत आणि बोलायचे इंग्रजी, त्यामुळे त्यांच्या किंवा इतर कोणाच्याही मराठीला सन्मुख मी कसा होणार?

त्यामुळे मुख्यतः मराठी-भाषिक अशा मुंबई शहरात राहात असूनही मराठी भाषेशी मी अगदी अल्पस्पर्शित होतो. तिचे सौंदर्य तर अल्पज्ञात नव्हे, अज्ञातच.

वास्तविक पाहता भाषासौंदर्यात मला गम्य नव्हते असे नव्हते. कॉलेजात इंग्रजी साहित्याचा अभ्यास करता करता मी इंग्रजी भाषा व साहित्याच्या प्रेमात पडलो होतो. गुजराती तर माझी मायबोली आणि त्या वेळेससुद्धा साहित्यप्रेमी तर होतोच. शिवाय साक्षरवर्य नरसिंहराव दिवेटियांसारखे शिक्षक मला लाभले. त्यामुळे त्या भाषेचे आणि साहित्याचे सौंदर्य माझ्या अणु-रेणूत पसरले असल्यास नवल ते काय!

पण मराठी? अं हं...! ती तर अवघड भाषा. कठोर वाटते. त्या मुली मराठीत बोलतात तेव्हा पाहा ना! आवाज अगदी मंजूळ, पण भाषा...? छे! छे! त्यात काही आपल्याला मजा वाटत नाही.

आणि खरोखरच मराठी भाषेबद्दल कधीही उत्सुकता वाटली नाही. कॉलेजात पण नाही आणि पुढे राजकारणात गेलो, तेथे तर कितीतरी मराठी-भाषकांच्या विशेष संपर्कात आलो, तेथेही नाही. त्या भाषेकडे मन कधी वळलेच नाही. कठोर, कर्कश, अनुस्वारांनी भरलेली. ती बोलणारे तिच्यावर कसे काय एवढे खुश असतील, हाच माझ्या मनाला मोठा प्रश्न पडायचा. त्यातसुद्धा काका कालेलकरांसारख्या माझ्या आवडत्या लेखकाने एकदा मराठीविषयी लिहिताना लिहिले, 'गोड मराठी' तेव्हा तर मला हसूच आले. काकासाहेबांसारखा माधुर्यप्रेमी माणूस ह्या भाषेला 'गोड' म्हणतो!

अशा अनेक कल्पनांमधे रमलेलो मी ह्या जगात रममाण होतो आणि तेव्हाच एक चमत्कार झाला.

१९३०–३१ साल असेल. सत्याग्रह ऐन रंगात होता. मीपण त्या संग्रामात आकंठ बुडालो होतो. मुंबईत त्याचे जोरदार संचलन करणाऱ्या बी. पी. सी. सी. च्या (मुंबई प्रांतीय राष्ट्रीय महासभेच्या) कारभारी समितीचा मी सभासद झालो होतो.

त्या वर्षी एकदा नरीमान, पाटील, गणपती शंकर, आबिदअली वगैरे अग्रगण्य नेते जेलमधे होते. तेव्हा भारतवर्षाचे एक महान नेते—बहुधा वल्लभभाई पटेल असतील—मुंबईत आले होते. बी. पी. सी. सी. ने त्यांच्यासाठी आझाद मैदानावर एक मोठी जाहीर सभा आयोजित केली होती. हजारो माणसे आली होती. त्या वेळेस मोठे मोठे सर्व नेते जेलमधे असल्यामुळे बी. पी. सी. सी. चा मंत्री ह्या नात्याने निफाडकर नावाचा एक तरुण मित्र कामगिरी बजावीत होता. त्यामुळे ह्या सभेत तो बोलणार होता.

मी तर त्या प्रसिद्ध नेत्याला ऐकायला गेलो होतो. निफाडकरला नव्हे. पण आता निफाडकरला ऐकण्यावाचून गत्यंतर नव्हते.

तेव्हा त्याचे भाषण ऐकले. बारीकसा तरुण मुलगा. दिसण्यात असामान्य असे काहीही नव्हते. खादीचा पायजमा आणि खादीचा झब्बा. हजारो लोकांच्या प्रचंड सभेमोर तो अगदी पोरसवदा दिसत होता.

त्याला इंग्रजी फारसे जमत नसावे. आणि हिन्दी तर तेव्हा बोटावर मोजता येतील इतकेच लोक बोलायचे. त्यामुळे त्याने मराठीतच बोलायला सुरवात केली. ‘ बंधूंनो आणि भगिनींनो...’ पासून सुरुवात केली, आणि मला हसूच आले. हा काय बोलणार आणि आझाद मैदानावरील ह्या जनतेला त्याच्या ह्या मराठी भाषणात काही रस वाटेल का ?

असा काहीसा मनातल्या मनात हसत कुतूहलाने मी निफाडकरकडे बघत राहिलो. पण ते हसणे क्षणार्धात कुठच्या कुठे पळाले. आणि बघताबघता जणू काही तो निफाडकरच संपूर्णपणे बदलला. खादीचा पायजमा, खादीचा झब्बा, सामान्य आका आणि सामान्य चेहरा—काहीही उरले नाही. माझ्यासमोर निमिषार्धात वाणीचा जणू धो धो वाहणारा महानद माझ्या कानात गर्जना करू लागला.

‘ हा आपला पुरातन कालापासूनचा प्रसिद्ध देश, हे त्याचे एक वेगळ्याच धर्तीचे युद्ध, आणि त्याचे पोलादी सरदार, हे तरुण आणि ह्या तरुणी...आकाशातून पुष्प-वृष्टी करायला उत्सुक असलेल्या देवांगना मला दिसतायत...राज्यकर्त्यांना मी...’ असे कितीतरी तो बोलला ! मी ते सगळे ऐकत राहिलो. त्याच्या वाग्गंगेत डुंबत राहिलो. भाषण संपले, पण त्यानंतर ते कित्येक दिवस माझ्या चित्तात गुंजन करीत राहिले. आणि त्या गुंजारवाने माझ्या चित्तात जणू काही लखलखाट झाला. मला वाटले : नाही, नाही. मराठी भाषा आपल्याला वाटत होती तेवढी काही कठीण, कठोर नाही. उलट हे तर अगदी कोमलात कोमल भावापासून भव्य-दिव्य भाव-भावनांना लीलया खेळवू शकेल असे आणि ऐकणाऱ्याला मंत्रमुग्ध करून टाकील असे एक आगळे माध्यम आहे.

त्यामुळेच माझ्या भाषाप्रिय, वाचनप्रिय जिवाला वाटले—ह्या भाषेपासून अलिप्त

राहणे योग्य नाही. तिच्याशी दोस्ती करावी; आणि तिची मृदुतम, कोमल आणि अतिभव्य स्फुरणे उपभोगावीत; आणि संधी मिळेल तेव्हा ही ऐकायला गोड वाटणारी भाषा ऐकत राहावी.

ती ऐकण्याचा निश्चय त्यानंतर आजतागायत बराचसा सांभाळला गेला आहे.

त्या वेळेस सदोबा पाटील कॉंग्रेसचे नेते होते आणि एक चांगल्या पैकी वक्ते होते. त्यांचे मराठी ऐकण्याची मौज मी बऱ्याच वेळा लुटली आहे. यशवंतराव चव्हाण पण माझ्या दृष्टीने ह्या भाषेच्या उत्तम वक्त्यांपैकी एक म्हणता येतील. त्यांची भाषणे पण मी आवडीने ऐकली आहेत. आणि आचार्य अत्रे! आचार्य अत्रे मराठीचे फक्त वक्ते नव्हते, प्रेमी होते. ते तर भाषेचे किती लाड करायचे! प्रेमाच्या प्रत्येक प्रक्रियेतून जाणाऱ्या मराठी भाषेचे मी त्यांच्या तोंडून लाड होत असलेले बघितले आहेत. आणि इचलकरंजीत हजारो लोकांना माझ्यासारखेच मंत्रमुग्ध होऊन पु. ल. देशपांड्यांच्या, मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष ह्या नात्याने केलेल्या सत्तरएक मिनिटांच्या लांबलचक व्याख्यानाचे आकंठपान करीत असलेले मी पाहिले आहे.

परंतु हा तर बोलीभाषेचा परिचय झाला. बोली स्वरूपात भाषेचे रूप कितीही लोभसवाणे दिसत असले तरी तिचे संपूर्ण रूप तिच्या लेखी स्वरूपातच प्रकट होणार. तिचे उफाळून आलेले सौंदर्य नखशिखान्त सजविलेले दिसते ते तिच्या लेखी स्वरूपातच.

तिच्या बोली रूपाच्या प्रेमात पडलेलो मी आता तिच्या सकल सौंदर्याचे पान करायला लालचावलो.

पण मराठीत लिहिलेले वाचायला अवघड वाटायचे. त्यांत इतके अनुस्वार यायचे की मला सगळीकडे टिंबेच टिंबे दिसायची आणि ते अनुनासिक उच्चार करायला गेलो की माझे मलाच हसू यायचे.

पण प्रत्येक प्रेमिकाला कोणी तरी सहायक भेटतो, तसे माझ्या बाबतीत पण झाले. राजकारणाबरोबरची प्रणयचेष्टा १९३५ साली मी विलेपार्ल्याला रहायला आलो आणि संपुष्टात आली. कारण त्याहूनही सुंदर असे नवीन प्रेमपात्र मला गवसले होते.

ते होते साहित्य आणि त्याचे सर्जन. ह्या सर्जनाची नवी नवी नशा आणि मुंबई शहरापासून इतक्या लांबच्या उपनगरात रहायला आल्यामुळे रोज उशीरापर्यंत बाहेर राहावे लागण्याच्या अडचणीमुळे मी माझ्या बी. पी. सी सी. च्या दुनियेला रामराम ठोकला आणि साहित्याच्या नव्या दुनियेत नवीन साथीदारांबरोबर हिंडू लागलो.

ते सगळेच धुरंधर होते, पण गुजराती भाषा आणि गुजराती साहित्याचे. मी सुद्धा राजकारणाची बहुभाषी दुनिया सोडून गुजराती साहित्याच्या एकभाषी दुनियेत आलो होतो. त्यामुळे मराठी भाषेचे संस्कार माझ्यापासून जणू दूरवर राहिल्यासारखे वाटले.

परंतु मराठी भाषेबरोबरची मैत्री अशी पुसून जाण्यासाठी झालेली नव्हती. विले-

पार्ल्याला आल्यानंतर माझी दोन जोडप्यांबरोबर चांगलीच दाट मैत्री झाली. त्यातील पहिले जोडपे म्हणजे डॉ. वसंत अवसरे आणि डॉ. काशीबाई अवसरे आणि दुसरे जोडपे म्हणजे सुशीला मराठे आणि नीळकंठ मराठे. ह्या चौघांनाही माझ्याइतकेच गुजराती बोलता येत असे, परंतु मराठी भाषा आणि मराठी साहित्याची अतिशय आवड. वसंत अवसरे तर कविता करायचा, लेख लिहायचा आणि संस्कृतचा तर गाढा पंडित. गप्पागोष्टी करण्यात त्याच्यासारखी:हुशार माणसे मला भेटली नाहीत असे नव्हे, पण त्याच्यापेक्षा सरस असा क्वचितच भेटला असेल.

तो नेहमी माझ्याजवळ संस्कृत, इंग्रजी आणि गुजराती साहित्याच्या गप्पागोष्टी करायचाच पण त्याच्या बरोबरीने मराठी साहित्याबद्दल पण बोलायचा. कविता म्हणायचा आणि समजावून सांगायाचा. त्यातील एक बहुतेक गडकऱ्यांचीच असावी— ती म्हणजे 'गुलाबी कोडे' नावाची सुकुमार, स्निग्ध, कविता तर मला अजूनही स्मरते.

पद्याप्रमाणे गद्याचा पण तो पारखी. त्या सुमारास आमची मैत्री अगदी ऐन रंगात होती. तेव्हा विश्राम बेडेकरांचे 'रणांगण' प्रसिद्ध झाले. लहानसे पुस्तक पण त्यातील गोष्ट अतिशय रसभरित पण अवसरेला त्या गोष्टीत किंवा त्या पुस्तकाच्या आकारमानात रस नव्हता. त्याचा सगळा जीव त्याच्या गद्यात. आणि मी गद्याचाच लेखक आणि प्रेमी. मला तो म्हणाला, "तू हे 'रणांगण' त्यांतील गद्यासाठी वाच. समजणार नाही तेथे मला विचार आणि त्यातल्या अनुस्वारांना घाबरू नकोस. ते जितके लिहिताना वापरले जातात, तितके बोलले जात नाहीत. त्यांच्या तीव्र स्वरूपात तर नाहीच." आधी त्याने थोडे वाचून दाखवले. ते निफाडकरसारखेच रसाळ व मधुर वाटले.

'रणांगण' वाचून काढले. त्याच्या छोट्या छोट्या गद्य तुकड्यांनी इतके प्रचंड विश्व माझ्यासमोर साकारले की त्या मुग्धतेतून माझी कदाचित आजही सुटका झालेली नाही.

पतीला वाचल्यावर पत्नीचा अपवाद कसा काय शक्य आहे? विभावरी शिरूरकरचा बुरखा ओढून बसलेल्या मालतीबाई बेडेकरांच्यापण काही कथाकादंबऱ्या वाचून काढल्या. आणि बेडेकरांना वाचले तर त्या वेळचे अत्यंत लोकप्रिय फडके–खांडेकर वाचणार नाही हे कसे शक्य आहे? पण अवसरे म्हणाला. 'हे दोघे छानच आहेत. पण माझे आवडते आहेत माडखोलकर. नागपूरच्या ह्या माणसाची खोली ह्या दोघांपेक्षासुद्धा कदाचित जास्ती असेल.' त्यांच्या कादंबऱ्यापण वाचल्या. शब्द स्वतःचे विश्व कसे उभे करतात, तेही नवी भाषा शिकत असतानाच अत्यंत प्रखरपणे प्रतीत होत गेले.

तरी पण हे सर्व गोष्टी—कादंबऱ्या—कवितांपुरते सीमित होते. त्यात भर घातली मराठे दांपत्याने. सुशीला मराठे म्हणजे पूर्वीची सुशीला दातार. अमदाबादच्या प्रा.

दातारांची कन्या. तिचे शिक्षण झाले गुजरातीतून. माझ्या गुजराती मित्रांमुळे तिची ओळख झाली–आणि मग तिचे यजमान नीळकंठ मराठे यांच्याबरोबर तर चांगलीच मैत्री झाली.

नीळकंठ मराठे म्हणजे सुप्रसिद्ध मराठी कवयित्री संजीवनी मराठे ह्यांचे दीर. संगीताचे जाणकार. साहित्याची आवड. माझी साहित्याची अभिरुची जाणून ते साने-गुरुजींचे 'श्यामची आई' घेऊन आले. आणि 'मराठी साहित्यात प्रथम पाऊल टाकणाऱ्यास' असे लिहून भेट देऊन गेले. साने गुरुजी कादंबरीकार तर होतेच. त्यांच्यापेक्षा सरस कादंबरीकार मी वाचले होते. परंतु ह्या 'श्यामची आई'चे जगच काही निराळे होते. मराठी भाषेचा एक नवीन पैलू दिसला.

मराठी भाषेचा परिचय वाढत गेला तसतसा मराठी-भाषकांचा परिचय पण भरा-भर वाढत गेला. माझ्या साहित्य अभिरुचीने मला अनंत काणेकर, गंगाधर गाडगीळ, बा. भ. बोरकर, मंगेश पाडगावकर, वसंत बापट, पु. ल. देशपांडे, प्रभाकर पाध्ये ह्या सर्वांशी परिचय करून दिला. त्यातून, गुजराथी असूनही अधिकांशाने मराठी असलेले माझे मित्र अ. भि. शाह ह्यांचा मराठी, गुजराथी, हिन्दी वगैरे लेखकांना एका व्यासपीठावर आणण्यात सिंहाचा वाटा आहे. त्यांच्या 'इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम' ह्या संस्थेत ह्या सर्व भाषांचे लेखक एकत्र येत, चर्चा करीत, एकमेकांचा दृढ परिचय करून घेत. त्या सर्वांचा अशा तऱ्हेने परिचय वृद्धिंगत झालाच. पण माझे नशीब शिकंदर! माझी मामा वरेरकरांबरोबर मैत्री झाली. पुण्यात 'आंतरभारती'चे यदुनाथ थत्ते ह्यांनी मला व्याख्यानासाठी आमंत्रण दिले तेव्हा माझी राहण्याची सोय विठ्ठलराव घाटे ह्यांच्याकडे केली होती. ते विशालहृदयी सज्जन अजूनही माझ्या डोळयांसमोर उभे राहतात. आणि ह्या व्याख्यानांचे अध्यक्षस्थान सांभाळणाऱ्या, माझ्या कारावास काळात मित्र झालेल्या रावसाहेब पटवर्धनांचा हसरा आणि प्रेमळ चेहरा–हा काय आजही माझ्यावर प्रेम-वर्षाव करतोय!

आता ही प्रेमाची गोष्ट करीत असतानाच पूर्वग्रहाच्या विध्वंसाची गोष्ट का सांगू नये? मराठी माणसे सविशेष अभिमानी, स्वतःला, स्वतःच्या भाषेला व स्वतःच्या ज्ञानाला इतर सर्वांपेक्षा श्रेष्ठ समजणारी आणि इतर भाषेतील सर्जक, विद्वानांना जरा तुच्छतेने किंवा स्वतः जणू काही त्यांच्यावर उपकार करीत असावेत अशा आढ्यतेने बघणारी समजली जातात, असे हजारो वेळा ऐकले होते. माझा स्वतःचा कधी तसा अनुभव नव्हता. मला राजकारणाच्या रिंगणात काय किंवा साहित्याच्या क्षेत्रात काय ह्या लोकांनी फक्त प्रेमच दिले आणि आपुलकीच दाखवली. तरी पण पूर्वग्रह तसे लवकर पुसले जात नाहीत. प्रच्छन्नपणे ते माझ्या मनात कुठेतरी दडून बसले असावेत.

परंतु पुण्याला मी गुजराथी साहित्याविषयी ' आंतरभारती'च्या आश्रमात व्याख्याने देण्याकरता गेलो तेव्हा माझ्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे मी नरसी मेहतापासून सुरवात करून आजच्या साहित्यकारांच्या गुणांविषयी बरेच बोललो. ते ऐकून सभेचे अध्यक्ष स्थान सांभाळणारे रावसाहेब पटवर्धन त्यांच्या समारोपाच्या भाषणात म्हणाले,

' एका प्रकारे हे ब्रोकर आपल्या महाराष्ट्रात जन्मले नाहीत ते बरे झाले. नाहीतर त्यांना कोणीही साहित्यकार म्हणाले नसते किंवा विद्वानपण म्हटले नसते कारण की त्यांनी तर किती तरी लेखकांची वाखाणणी केली ! कोणी विद्वान माणूस असे करील का हो ? विचारा आपल्या मराठी सज्जनांना ! दुसऱ्याचा पाणउतारा करीत नाहीत, तोपर्यंत त्यांच्या दृष्टीने ते स्वतः विद्वान ठरत नाहीत ! '

मी तर थक्क होऊन ऐकतच राहिलो. हे तर चक्क पुण्यात, मराठी संस्कृतीच्या बालेकिल्ल्यात, महाराष्ट्रीय लोकांच्याविरुद्ध बोलून गुजराती माणसाचे कौतुक करीत होते ! ते करणारच हो !—मोठ्या मनाचे होते. पण इतर स्त्रीपुरुष पण त्यांच्याशी सहमत असल्याप्रमाणे त्यांच्या म्हणण्याला दुजोरा देत होते, हसत होते, माना हलवीत होते. म्हणजे हे लोक पण आपल्यासारखेच म्हणायचे तर ! चांगले वाटेल त्याला चांगले म्हणावे आणि स्वतःच्या दोषांची टीका निर्भीडपणे करावी ! माझ्याबरोबर त्या सभेला आलेल्या मृणालिनीताई देसाईंनी मला सांगितले की हा काही अपवाद नाही. समजूतदार माणसे सगळीकडे अशीच असतात. मनात कुठे तरी नवीन प्रकाश उजळल्यासारखे वाटले.

त्याहीपेक्षा जास्त आकर्षक प्रकाश इचलकरंजीला मराठी साहित्य संमेलनात आमंत्रित पाहुणा म्हणून मी गेलो तेव्हा मला जाणवला. अध्यक्ष होते पु. ल. देशपांडे. माझी बोलायची पाळी आली तेव्हा त्यांनी मला विचारले,

" कुठल्या भाषेत बोलता ? "

" हिन्दीत " मी म्हटले.

" का बरं ? " त्यांनी म्हटले, " गुजरातीतच बोला ना ! " समोर दहाएक हजार स्त्रीपुरुष बसलेले. तळमहाराष्ट्रातले.

गुजरातीत बोललो. कोणीही ओरडलं नाही, ' मराठी, मराठी ' किंवा ' हिंदी' हिंदी '. सर्वांनी शांतपणे माझे म्हणणे ऐकून घेतले. हसण्यासारखे होते तेथे हसले, गंभीर व्हायचे तेथे गंभीर झाले आणि आवडले तेथे टाळ्या वाजविल्या. जणू काही मी अहमदाबाद किंवा राजकोटला असावा असे वाटले. ' गुजराथी ' म्हणून नाकाच्या शेंड्यावर राग आणणाऱ्या गुजरात–विरोधकांच्या गावात नव्हे.

पु. ल. देशपांड्यांच्या तिथल्या भाषणाची गोष्ट मी अगोदर केलीच आहे. पण निफाडकरच्या त्या भाषणाने मला जो अनुभव आला होता, ज्यामुळे मला मराठी भाषा मैत्री करण्याजोगी, प्रेम करण्याजोगी वाटली होती, तसाच अनुभव मला आणी-

बाणीनंतरच्या निवडणुकीच्या वेळेस पु. लं. च्या पार्ल्याला झालेल्या भाषणाच्या वेळेस आला.

तुफान गर्दी जमली होती. कमीत कमी पाच ते सात हजारांचा जमाव जमला असावा आणि देशपांडे बोलायला उभे राहिले.

'बंधुंनो आणि भगिनींनो......'

लोक अस्वस्थ झाले. ही सभा साहित्यसभेची शिस्तबद्ध सभा नव्हती. ही तर निवडणुकीच्या राजकारणाची, धुमाकुळीची सभा होती. ओरडा ऐकू आला. 'हिंदी, हिंदी, हिंदी.'

पु. ल. हसत उभे राहिले. आरडाओरडा शांत झाल्यावर परत बोलले— मराठीतच.

"मला ऐकून तर घ्या. आज मी जे बोलतोय ते नाही मराठी, हिंदी, नाही गुजराती, नाही इंग्रजी. मी तर माझ्या हृदयाची भाषा बोलतोय. आणि हृदयाची भाषा कोणीही समजू शकतो. तुम्ही पण समजू शकाल बघा......"

आणि त्यानंतर तासभर त्यांच्या भाषेचा धबधबा अविरत कोसळत होता. लोक मंत्रमुग्ध, शांत, दीप्तिमंत. मी प्रेमी तर होतोच, पागल झालो. देशपांड्यांचे नाटक 'तुझं आहे तुजपाशी' आवडले होते, पण त्याने असे वेड नव्हते लावले.

तसेच विद्वानांच्या विद्वत्तेचा परिचय पण झाला. सिमल्याला एक परिसंवाद आयोजित केला होता. संपूर्ण भारतातील विद्वान लोक तेथे आले होते. काही भाषाशास्त्रीसुद्धा आले होते.

मी फार थोड्या भाषाशास्त्रींना ओळखतो. तेथे आलेल्यांपैकी फक्त प्रबोध पंडितांशी माझा परिचय. तो पण मोठे भाषाशास्त्री म्हणून नव्हे, तर गुजराती होते आणि प्रसिद्ध होते म्हणून. परंतु तेथे तर सुनीतिकुमार चटर्जी होते—भारताच्या भाषाशास्त्राचे पिता—इतरही बरेच लोक होते. पण मी प्रभावित झालो तो दोन मराठी भाषापंडितांमुळे ते म्हणजे अशोक केळकर आणि सु. मं. कत्रे. त्यांची वाणी, वर्तन, बोलण्याची पद्धत मनात त्यांच्याबद्दल आदरभाव उत्पन्न करायची. त्यानंतर कत्र्यांना भेटायचा योग आला नाही. पण अशोक केळकरांशी अजूनही माझे मित्र म्हणून शक्य तितका परिचय टिकून आहे. ह्या सर्वांना भेटल्यानंतर एक गोष्ट मला प्रकर्षाने जाणवली ती अशी, की ह्या पातळीची माणसे फक्त भाषाशास्त्रच जाणत नाहीत तर भाषेच्या सर्जक व्यक्तित्वाला पण खोलवर ओळखतात. आणि हे ओळखणारे इतर कुठलेही भाषाभाषी असोत, त्यांच्यावर प्रेम करतात.

तरीपण माझे मराठीचे ज्ञान विशिष्ट पातळीचे होऊ शकले नाही की, त्या जिच्यामुळे भाषेच्या विचारांचे द्रव्य ज्यात जतन केले गेले असेल अशी वैचारिक व तात्त्विक पुस्तकेदेखील मी वाचू शकेन. परंतु त्याचे मला फारसे वाईट वाटत नाही. कारण





अनुक्रमणिका

की मला असे वाटते, की कुठल्याही प्रजेचे अंतरंग जाणून घ्यायचे असले तर ते त्या प्रजेच्या सर्जनात्मक सृष्टीच्या परिचयातूनच जाणून घेता येईल. आणि असा परिचय मला थोडाफार पूर्वी सांगितल्याप्रमाणे त्या सर्जकांच्या कार्यातून आणि नंतर नारायण सुर्वे वगैरे कवी आणि अनिल बर्वे वगैरेंच्या सर्जनातून होतच आहे.

अशा तऱ्हेने एक प्रकारच्या संपूर्ण उपेक्षेपासून सुरुवात करून एक प्रकारच्या प्रेमापर्यंत पोहोचलेली, मराठी भाषा आणि मराठी भाषकांच्या परिचयाची माझी यात्रा आज जवळजवळ वयाच्या पंचाहत्तराव्यावर्षी पण पूर्ण झालेली नाही. अजून आजही कधीतरी दिलीप चित्रेचे लिखाण हाती लागते. राजाध्यक्षांचे विचार आणि विजयाबाईची गोष्ट हाती लागते. तेंडुलकरांच्या नाटकाशी ओळख होते तेव्हा प्रत्येक वेळेस मराठी भाषेबरोबरची माझी मैत्री म्हटलीत तर मैत्री, प्रेम म्हणाल तर प्रेम अधिकच गाढ होत जाते.

त्यातही जेव्हा तुकाराम, एकनाथ किंवा ज्ञानेश्वरांविषयी विनोबाजींचे लिखाण वाचतो, तेव्हा भूतकाळात भक्ती, काव्य आणि तत्त्वज्ञान ह्या विषयांत ह्या भाषेने किती उत्तुंग शिखर गाठले होते ते लक्षात येते आणि दाटून येते.

तरीपण मराठी भाषेच्या माझ्या परिचयाची, माझ्या मैत्रीची, माझ्या प्रेमाची गोष्ट इतकी विस्तृतपणे सांगत असताना एक गोष्ट पुन्हा सांगितल्याशिवाय हा लेख पूर्ण करू शकत नाही.

ती म्हणजे इतक्या जवळजवळ राहात असूनही लांब लांब असल्यासारखे मुंबईत राहणाऱ्या मराठी व गुजराती भाषक लोकांची एकमेकांमधली अलिप्तता.

अर्थात् मराठीत कोण कोण मोठे लेखक आहेत, विचारवंत आहेत, संत-महात्मे आहेत ते गुजराती लोकांना माहीत नाही असे नाही. त्याचप्रमाणे गुजरातीत ह्या क्षेत्रात कोण कोण आहेत ते मराठी लोकांना माहीत नाही असे पण नाही. परंतु ही ओळख फक्त नावापुरतीच, बहुधा मर्यादित असते.

साहित्याच्या क्षेत्रात मराठी किंवा गुजराती त्यांच्या कृतींमुळे, जितके रवीन्द्रनाथ किंवा शरच्चंद्र किंवा प्रेमचंदांना ओळखतात तितके मराठी किंवा गुजराती लेखकांना ओळखतात का? गुजराती लोकांसाठी खांडेकरांचा एक काळ येऊन गेला. पण आता तसं नाही. रमणलाल किंवा मुनशी क्वचित काही काळ महाराष्ट्रात वाचले गेले, पण आता ते पण विस्मरणात गेले.

असे का व्हावे? आपण एकमेकांचे उत्तम गुण जाणून घ्यायला एकमेकांच्या भाषेतून त्यातील उत्तम सर्जनांचा अनुवाद नको का करायला? आपण द्विभाषी परिसंवाद, चर्चा सभा, वाद-विवाद, वगैरे आयोजित नको का करायला? मराठीतून गुजरातीत अनुवाद करण्याचे कार्य लहान प्रमाणात उमाशंकर जोशी ह्यांनी हल्ली सुरू केले आहे. सुरेश दलाल व जया महेता पण अविरतपणे करीतच आहेत.

महाराष्ट्रात असे नाही का होऊ शकणार ? काही प्रमाणात मृणालिनी देसाईनी ते केले आहे पण त्याचा व्याप खूप विस्तृत करायला हवा आहे. व्हायलाच हवा परंतु त्यातील गोम एकच आहे. ' योजकस्तत्र दुर्लभः ' अ. भि. शाह पुण्याला गेले, त्यानंतर इतर अनेक कार्यात ते गुरफटले गेले आणि हे जे मूलभूत काम ते करीत होते, ते बंद झाले.

आणि आता तर ते पण नाहीत !

मला तर पुष्कळदा वाटते की सामान्य माणसांना किंवा विशेष जाणकारांना पण, मग ते मराठी भाषक असोत वा गुजराती भाषक, हिन्दी भाषेचा आणि साहित्याचा जितका परिचय आहे तितका ह्या शेजारी भाषेचा नाही. मुंबईसारख्या शहरात तरी ही चालवून न घेता येण्याजोगी स्थिती म्हणायची.

आपण सर्व, संपूर्ण जगाच्या भाषा आणि साहित्याचे चाहते, परस्परांच्या भाषेविषयी—ज्या समृद्ध पण आहेत आणि ज्यांत उत्तम सर्जन पण झालेले आहे—जेवढे जाणतो त्यापेक्षा विशेष माहिती नक्कीच मिळवू शकू.

त्या दिशेने प्रयत्न तरी करू या ! त्या दिशेने प्रयत्न करणारे आपल्याला मिळोत !

**३९७ स्वामी विवेकानंद मार्ग, विले पार्ले पश्चिम, मुंबई ४०००५६**

**मूळ गुजरातीवरून मराठी अनुवाद : मंगला सुभाष साठे**

---

**बदनाम पदनाम**

आचार्य अत्रे यांची ओळख झाली. तेव्हा ते म्हणाले होते, " गावातल्या हायस्कूलातल्या मुख्याध्यापकाची जागा मला मिळत होती, पगारही चांगला होता. पण मी विचार केला, तिथे मुख्य झालो तर लोक म्हणणार हेडमास्तर अत्रे ! कॅंप एज्युकेशन सोसायटीत पगार कमी होता. पण तिथल्या हेडमास्तरला प्रिन्सिपॉल म्हणत ! म्हणून मी ठरवले प्रिन्सिपॉल अत्रे व्हायचे ! अरे सामान्य माणसाला वाटतं, प्रिन्सिपॉल म्हणजे कॉलेजचाच असणार ! "

**विश्राम बेडेकरांनी सांगितलेली आठवण ( त्यांच्याच शब्दात )**

---





अनुक्रमणिका

# किलकिला दरवाजा

**लक्ष्मण माने**

[ लक्ष्मण माने गेले काही महिने रविवार सकाळ ( पुणे ) मधून ‘ बंद दरवाजा ’ हे सदर चालवीत आहेत. त्यांनीच ९·१०·१९८३च्या अंकात घेतलेला एक आढावा.]

गेले आठ-नऊ महिने मी बंद दरवाजा ठोठावतो आहे. तो उघडेल की नाही हे जरी ठाऊक नसलं तरी त्यासंबंधी आलेल्या वाचकांच्या प्रतिक्रिया आणि भटक्या विमुक्तांच्या कामाला त्यानं किती मदत झाली, याचा ताळेबंद एकदा वाचकांपुढे मांडला जावा असे सारखे वाटू लागले.

तर ‘ बंद दरवाजा ’ स्तंभ सुरू झाला तेव्हापासून असंख्य वाचकांची पत्रे आली. काहींनी कळवळून लिहिले. काहींनी ज्ञानात भर पडल्याचे लिहिले. तर काहींनी हा भिकार प्रकार वाङ्मयात कशाला ? ही घाण साहित्य आहे काय ? आम्ही पोराबाळांना अंक वाचायला द्यावा कसा ? एका सद्‌गृहस्थांनी लिहिलंय ‘ आता दरवाजा बंदच करा. ’ त्यात नवीन काही नाही. कोणत्याही झोपडपट्टीत गेलं तरी हे सगळं पाहायला मिळतं. तर काहींनी लिहिलंय, भाषा समजत नाही. पण ही झाली मध्यमवर्गीय वाचकांची पत्रं. दूर ग्रामीण भागातून ही पत्र आलीत. त्यांतही दोन्ही प्रकार आहेत. तेव्हा जे स्वागत करतात त्यांचे आभार मानणे माझे कर्तव्य आहे आणि जे ‘ नाकं मुरडतात ’, ज्यांना माणसापेक्षा त्यांच्या आंधारी, अघोरी मरणापेक्षा, त्यांच्या यातना आणि दुःखापेक्षा, त्यांच्या भोगवट्यापेक्षा भाषेचं मूल्य महत्त्वाचं वाटतं, त्यांना एवढीच विनंती की भाषा आणि शब्द माणसं समजावून घेण्यासाठी असतात. भाषा हे माणसाला समजावून घेण्यात आडकाठी ठरत असेल तर त्या भाषेचा नीट विचार केला पाहिजे. मलाही सगळ्याच जमातींची भाषा समजते असे नाही. पण मी समजून घेतो. मलाही कंटाळल्यासारखं वाटतं. पण तिथलं वास्तव एवढं भयंकर असतं की भाषा ही अडचण होतच नाही. समोरच्या माणसाचं जगणं कितीही इमान-दारीनं मांडायचं ठरवलं तरी चार आणेसुद्धा कागदावर आणता येत नाही, हे खरं दुःख आहे.





अनुक्रमणिका

तर भाषेबद्दल ज्या तक्रारी आल्या त्यात बऱ्याच मध्यमवर्गीय वाचकांच्या आहेत. त्या जगाचा विचार केला तर हे उच्च वर्गीयांचे जग अलग आहे, एवढंच दिसतं.

पण मला वाटतं, यापेक्षा दुसरी बाजू आहे ती आपण नीट समजून घेतली पाहिजे. परवा झबझब्या पारध्याच्या कोपटात पाहिलं. झबझब्यानं पेपरातल्या जातपंचा-यतीच्या आलेल्या बातम्या आणि बंद दरवाजा ज्यात पारधी समाजाच्या प्रश्नाला वाचा फोडली होती, एकाच फ्रेममध्ये घालून ठेवलेत आणि त्याची बायको सांगत असते, " आता यावंदे पोलिस. आला पोलिस की ही फुटूची कापी दावतो का गुमान मागारी जातूया. तुला म्हणू लय नामी झालं बग. " तर हडपसरच्या माकडवाला वसाहतीतही पहिल्यांदाच वर्तमानपत्र म्हणजे काय ते पोहोचतंय. माकडवाला समाजाची माहिती आली म्हटल्यावर पाचपन्नास माणसं गर्दीगर्दीनं अंक वाचत असतात. काही पोरं सांचं अंकासाठी गावात हिंडत असतात. प्रत्येकाला वाटत असतं. ' आर, आपल्या समाजाबद्दल आज पेपरात छापून आलंय. मग कोणत्या पेपरात आलंय ते हुडकायचा आन ' वाशाला ' खवून ठिवायचा.

परवा शिवलाल यादव सांगत असतो, ' बंद दरवाजा ' हे मुक्यांना वाचा देणारं आहे. आम्ही सेटलमेंटमध्ये सगळे मिळून एकत्र वाचतो. त्याच्यावर चर्चा करतो.

... ... .....

मला वाटतं भाषा, भाषा असते आणि तिने माणसामाणसातले संबंध अधिक समर्पकपणे समजून घेता येतात. एका कॉलेजच्या प्रोफेसरबाई कळवतात, ' सुरुवातीला कसंसंच होत होतं वाचताना. पण एकदा प्रयत्न करून वाचायला लागले आणि नंतर त्याचा एवढा परिणाम दिसला की आपण कुंपणाच्या आत सुरक्षित आहोत, पण हे कुंपण काटेरी आहे. आपण खरे गुन्हेगार आहोत. ज्याला दोन वेळचं खायला-प्यायला मिळतं त्याला या देशात तक्रार करायला जागा कुठाय. या अशा अनेक प्रतिक्रिया आल्यात. तशा त्या संपादकांकडेही आल्या असतील. यात जेवढा जिवंत-पणा आणता येईल तेवढा प्रामाणिकपणे आणावा. हा माझा प्रयत्न. कित्येकदा किळस यावी, येवढं वाईट पाहावं लागतं. ऐकावं लागतं. आपण पाहातोय ती माणसं की जनावरं असा प्रश्न पडावा एवढं वाईट पाहातोय. ते जसंच्या तसं उचलावं असा माझा प्रयत्न. त्यात मीच अपुरा ठरतोय, कारण समोरचं वास्तव, वास्तव न वाटावं इतकं भयानक आहे !

## संज्ञापन आणि लोकशाही

### वसुधा माने

एकदा गढीत एक पाकिस्तानी चित्रकार आला होता. म्हणाला, " इथं कुणी

मुस्लिम चित्रकार असतील तर मला भेटायचंय." गोगी सांगत होती की, आम्ही सर्व बुचकळ्यात पडलो. कारण असा विचार आम्ही कुणीच केला नव्हता. मग मला आठवलं, की जी. आर. संतोष मुस्लिम आहेत. त्यांच्याकडे मी त्यांना घेऊन गेले. नेहमीप्रमाणे मारिश बरोबर होताच. संतोषच्या मांडीवर बसून त्यानं प्रथम चॉकलेट्स हस्तगत केली व संतोषची परवानगी विचारून त्याची चित्रं बघू लागला. आमच्या गप्पा चालू झाल्या.

अचानक मारिश समोर येऊन उभा राहिला. संतोषला म्हणाला, "अगर आप इजाजत दे तो मैं एक सवाल पूछूं?"

पुन्हा एकदा मारिशने खात्री करून घेतली, की त्याच्या प्रश्नाने संतोष रागावणार नाही, आणि मग म्हणाला, "मी तुमची सगळी चित्रं पाहिली. एकच एक चित्र तुम्ही सगळीकडे रंगवलंय. सगळीकडे आपले ते दोन गोळे..."

संतोषच्या चित्रात तांत्रिक फिगर्स असतात. स्त्रीच्या नग्न शरीराचे अनेक अवयव त्यात असले तर नवल काय? पण मारिशला पटेल असं त्याचं कारण कसं सांगायचं असा पेच संतोषला पडला. तेव्हा त्याने सोपा मार्ग धरला. गंभीरपणे तो मारिशला म्हणाला.

"हाँ बेटा, थोडीसी रुकावट आयी है."

तात्काळ मारिशने सुचवलं, "तुम्ही माझ्या आईसारखं का करत नाही? थोडा वेळ थांबा. मग सोपं जाईल."

इकडे त्या पाकिस्तानी चित्रकाराच्या चेहऱ्यावरच्या आश्चर्याच्या छटा अधिकाधिक गडद होत गेल्या.

तो उद्गारला, "ही लोकशाही. आमच्याकडे या प्रसंगाची कोणी कल्पनाही करू शकणार नाही. एक वयानं लहान असलेला माणूस (मुलगा) वडीलधाऱ्याला असा प्रश्न करील? आपलं मत स्पष्ट बोलून दाखवील!"

**मूळ प्रकाशन : गोगी पाल : एक विलक्षण चित्रकार, स्त्री, नोव्हेंबर १९८३, पृ. ३९ (संक्षेपाने)**

---

**शिक्षकाचे काम**

शिक्षकाचे काम अधिकाधिक आत भरण्याचे नाही, तर अधिकाधिक बाहेर आणण्याचे आहे.

**फ्रीड्रिछ फ्रयोबल**

(जर्मन शिक्षणतज्ज्ञ आणि बालोद्यान शाळांचा प्रवर्तक १७८२–१८५२)

---

# मुलाखत : एक घेणे

## प्रभाकर नारायण परांजपे

मुलाखत घेणे हे एक कौशल्य आहे की कला? संज्ञापनाच्या क्षेत्रात मुलाखतीचे महत्त्व वाढते आहे. मॅजेस्टिकच्या गच्चीपासून आकाशवाणी-दूरदर्शनच्या स्टुडिओ-पर्यंत आणि वृत्तपत्रांच्या रकान्यांपासून नियतकालिकांच्या व ग्रंथांच्या पृष्ठांपर्यंत मुलाखतीचे क्षेत्र विस्तारलेले आहे. सर्वसाधारणपणे मुलाखत्या एक आणि मुलाखत-मूर्तीही एक असे दृश्य दहापंधरा वर्षांपूर्वीपर्यंत असे. पण आता मुलाखत्या एक आणि मुलाखतमूर्ती अनेक ( उदाहरणार्थ, समाजशास्त्रीय व वृत्तपत्रीय पाहणी ) आणि मुलाखत्ये अनेक व मुलाखतमूर्ती एक ( जाहीर व दूरदर्शनवरील मुलाखती ) असे पाठभेदही दृष्टीस पडतात. मुलाखतमूर्ती हा तज्ज्ञ, विशेष कर्तृत्व गाजवलेला असू शकतो, त्याचप्रमाणे तो कुठल्या तरी वर्गाचा / पिढीचा / पक्षाचा प्रतिनिधीही असू शकतो. मुलाखत घेण्याचे उद्देशही विविध असू शकतात. व्यक्तिमत्त्व परिचय ( ‘ प्रतिभा आणि प्रतिमा ’ प्रकारातल्या मुलाखती ), छंद-परिचय ( ‘ मुलखावेगळी माणसे ’ प्रकार ) माहितीचा प्रकार ( अंटार्क्टिका मोहिमेतील शास्त्रज्ञाची मुलाखत ), किंवा बातमीचा शोध व प्रचार ( राजकीय पुढाऱ्याची, शासकीय / खाजगी कंपनीच्या अधिकाऱ्यांची मुलाखत ), असे विविध हेतू मुलाखतींमागे असतात.

मुलाखतींमधील या विविधतेकडे पाहिले की सर्व मुलाखतींना लागू पडतील असे नियम सांगणे अवघड आहे हे पटेल. त्याचप्रमाणे मुलाखत घेणे हे प्रामुख्याने एक कौशल्य आहे हेही पटेल.

मुलाखत–कौशल्याचे घटक म्हणून काही गोष्टींचा उल्लेख करता येईल. मुलाखत-पूर्व तयारी, मुलाखत घेताना सांभाळायची पथ्ये आणि मुलाखत—लेखनाची / संपादनाची कौशल्ये असे त्यांचे तीन भाग करता येतील. आकाशवाणी–दूरदर्शनवरील ‘ लाइव्ह ’ मुलाखती आणि ‘ जाहीर ’ मुलाखती यांत या तिसऱ्या टप्प्यावरील कौशल्यांना फारसा वाव नसतो. म्हणूनच त्या घेण्यासाठी अधिक तयारी आणि अधिक कौशल्य लागते. आणि तरीही प्रत्येक ‘ लाइव्ह ’ मुलाखत म्हणजे ‘ नित्य नवा दीस—जागृतीचा ’ या प्रकारातील ठरण्याची शक्यता असते. मुलाखत्या व मुलाखत-मूर्ती या दोघांनाही ती नवा अनुभव, नवे आव्हान देणारी ठरते.

मुलाखत म्हणजे प्रश्न आणि उत्तरे. मुलाखत्याची पुरेशी पूर्वतयारी नसेल तर ती भरकटून कुठेही जाऊ शकते, खोटी वाटू शकते किंवा कालापव्यय करून प्रेक्षकांच्या सहनशीलतेचा अंत बघणारी ठरू शकते. म्हणून प्रश्न कोणते विचारायचे आणि कोणत्या क्रमाने विचारायचे त्यांची अपेक्षित / अनपेक्षित उत्तरे काय येऊ शकतील, उत्तर लांबू लागले, अप्रस्तुताच्या गाळात जाऊ लागले तर उत्तरकर्त्याचा अपमान न होईल अशा पद्धतीने त्याला पुढच्या प्रश्नाकडे कसे न्यायचे या साऱ्या गोष्टींचा विचार प्रश्नकर्त्याने आधीच करून ठेवलेला असायला हवा. मुलाखतीत महत्त्व असते मुलाखतमूर्तीला. त्यामुळे मुलाखत्याने आपली विद्वत्ता दाखविण्याचा, मुलाखतमूर्तीला पेचात पकडण्याचा किंवा त्याला आपली मते पटवून देण्याचा मोह टाळला पाहिजे. आपण प्रश्न विचारायचे ते आपल्यासाठी नव्हेत, तर आपल्या श्रोत्यांसाठी / प्रेक्षकां-वाचकांसाठी याचे भान मुलाखत्याने बाळगलेच पाहिजे. मुलाखतमूर्तीवर कुरघोडी करण्याचा, मुलाखतमूर्तीपेक्षा आपण जास्त वेळ बडबड करत बसण्याचा मोह मुला-खत्याला पडला तर सुबुद्ध प्रेक्षक / श्रोते / वाचक दूरचित्रवाणीसंचाच्या / नभोवाणी-संचाच्या गुंड्या फिरवून किंवा छापील पाने दूर भिरकावून त्याचे तोंड बंद करण्याचा संभव असतो. काही तयारी न करता मुलाखतीच्या रिंगणात उतरलेल्या मुलाखत्यांना काही मुलाखतमूर्तीही चांगलेच फटकारतात. अमोल पालेकरांची मुलाखत घेताना एक नवशिक्या पत्रकाराने त्यांना विचारले की, " आपण कोणते सामाजिक कार्य करता ?" पालेकरांनी त्यावर ताडकन् " काहीही नाही " असे उत्तर दिलेच, पण त्याबरोबरच " तुम्हाला सामाजिक कार्य म्हणून काय अपेक्षित आहे ? " असे उलट विचारून त्याला निःशब्द केले होते !

पत्रकारितेच्या सर्व प्रकारांमध्ये ' मुलाखत ' हा एक अधिक सुसंस्कृत आणि माहितीपर करमणूक करणारा प्रकार आहे. निबंधवजा लेखापेक्षा मुलाखतीमध्ये नाट्याला, क्रिया प्रतिक्रियेला आणि अनपेक्षिततेला कितीतरी अधिक वाव असतो. शब्द आणि उत्तर यांच्यातील शब्दांमागे त्या त्या व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व डवरलेल्या आभाळाप्रमाणे ओथंबून उभे असते. मुलाखत लिहिताना खाजगी संदर्भ, नाती व संबंध टाळून, फालतू तपशील व फाजील सलगी वगळून एखाद्या नाट्यमय भेटीप्रमाणे संवाद लिहिले पाहिजेत. म्हणजेच, प्रश्नांचा क्रम तर्कसंगत, मुद्देसूद ठेवण्याचा मोह टाळावा. मुलाखतमूर्ती भेटल्यावर कोणताही सामान्य माणूस ( अर्थात् त्या मुलाखत मूर्तीला ओळखणारा सामान्य माणूस ) तिला कोणता प्रश्न आधी विचारेल, त्याला कोणत्या गोष्टींचे कुतूहल वाटेल याचे भान मुलाखत लिहिताना बाळगले पाहिजे. ' जड ' विषय आणि हलकेफुलके विषय यांची आळीपाळीने पेरणी करून वाचनीयतेचे पीक काढता येते. ( कंटाळ्याचे तण त्यामुळे माजत नाही, असे म्हणा हवे तर ! ) मुलाखत-लेखनात ओघ महत्त्वाचा. छोटी उत्तरे आणि लांबट उत्तरे ( व अर्थात

प्रश्नही ), अपेक्षित प्रश्न आणि अनपेक्षित प्रश्न, मतैक्य आणि मतभेद, तात्त्विक विवेचन आणि समर्पक उदाहरणे यांचा मेळ घालून (वाद्यमेळातही हेच तत्त्व असावे!) ओघ निर्माण करता येतो. काही बाळबोध मुलाखत्यांची अशी ( गैर ) समजूत असते की प्रत्यक्ष मुलाखतीत विचारलेल्या प्रश्नांचा क्रम ' पवित्र ' असतो ! खरे पाहाता, मुलाखत-लेखनातच काय पण एकूणच व्यावसायिक पत्रकारितेत दोनच पैलू ' पवित्र' असतात. वस्तुस्थिती आणि रंजकता !

काही वेळा संवादांतूनच व्यक्ती उभी करता येते ( ' माणूस 'च्या दिवाळी १९८३ अंकातील श्री. पु. भागवतांची मंगेश पाडगांवकरांनी घेतलेली मुलाखत ताजी आहे ) तर काही वेळा संवादात येऊ न शकणाऱ्या तपशिलांची पेरणी करीत मुलाखत लिहावी लागते ( याचे बृहद् उदाहरण म्हणजे विंदा ऊर्फ गो. वि. करंदीकरांची विजया राजाध्यक्षांनी ' ललित'साठी घेतलेली मुलाखत.) जेथे मुलाखतमूर्तीच्या व्यक्तिमत्त्वाला, विचारांना महत्त्व आहे अशा मुलाखतीत मुलाखत्याने स्वतःच्या ' अहम् 'चा जास्तीत जास्त संकोच केला आणि मुलाखतमूर्तीचा ' अहम् ' जास्तीत जास्त फुलवला तरच ती मुलाखत यशस्वी होण्याचा संभव असतो. काही मुलाखत्यांना नेमके याच्या उलट करण्याचा मोह अनावर होतो. ( दूरदर्शनवर अशोक शेवड्यांनी घेतलेली मधू आपटे यांची मुलाखत आठवून पाहा. याउलट अनेक सामान्य चित्रपट व्यक्तींची विशेषतः नटांची मुलाखत घेताना तबस्सूम त्यांना कसे खुलविते तेही आठवून पाहा ! ) दोन लक्षवेधी व्यक्तिमत्त्वे संवाद करीत असली आणि त्यातल्या मुलाखत्या आपली भूमिका चोखपणाने पार पाडीत असला तर मुलाखत किती सुंदर होते 'याचीही उदाहरणे कधी कधी पाहायला मिळतात. ( अर्थात असे योग तुलनेने दुर्मिळच असतात ! ) डॉ. शिरोडकरांची तेंडुलकरांनी घेतलेली मुलाखत आठवतेय ? आणि डॉ. अशोक रानड्यांनी घेतलेल्या काही मुलाखती ?

लिहून झालेली किंवा ध्वनिमुद्रित झालेली मुलाखत प्रकाशित करण्यापूर्वी मुलाखत-मूर्तीला दाखवणे/ऐकवणे आणि त्याची संमती घेणे हा एक आवश्यक असा संकेत आहे. पत्रकार–परिषदांतल्या मुलाखतींच्या बाबतीत हा संकेत पाळणे शक्य असतेच असे नाही. पण इतर मुलाखतींच्या बाबतीत तो पाळायलाच हवा. हा संकेत न पाळणाऱ्या मुलाखत्यांच्या काही अनुभवानंतर मुलाखतमूर्ती त्यांना कटाक्षाने टाळतात.

लंडन मॅगेझिनच्या प्रत्येक अंकात एका साहित्यिकाची प्रदीर्घ मुलाखत असे. त्या साहित्यिकाच्या प्रेरणा, आविष्कार–वैशिष्ट्ये, विशेष सामर्थ्ये यांची त्यातून वाचकाला उत्तम जाण येई. अशा मुलाखती म्हणजे चांगल्या साहित्य–समीक्षेचाच एक आविष्कार ! त्या मुलाखतींचे एक पुस्तकही प्रसिद्ध झाले आहे. आपल्याकडेही असे काही प्रयत्न झाले. पण त्यांमध्ये साहित्यिक टेबलाशी बसून लिहितो की डेस्कशी, तो ' स्फूर्ती 'साठी चहा पितो की सिगारेट, अशा फालतू तपशिलांवर भर दिलेला आढळतो.

किंवा मग मुलाखत किती हप्त्यात झाली, त्या वेळी चहा किती वेळा झाला, वेळ कोणती ( प्रसन्न सकाळ/दुपार/संध्याकाळ ) होती अशा कादंबरीत शोभणाऱ्या, तपशिलांवर !* मुलाखत मूर्तीचे व्यक्तिमत्त्व व कर्तृत्व म्हणजे एक दर्या आहे अशी कल्पना केली तर त्या दर्यावर होडी आकारलेल्या वाचकाला/श्रोत्याला/प्रेक्षकाला भरकटू न देता त्याच्या होडीचे सुकाणू सांभाळण्याचे काम मुलाखत्याला करावे लागते.

अलीकडे दूरदर्शनवर तुम्ही काही दुहेरी मुलाखती पाहिल्या असतील. दुहेरी मुलाखत म्हणजेच एकावेळी एकाच मुलाखत्याने दोन व्यक्तींची मुलाखत घेणे. दूर-दर्शनवरच्या ' आमची पंचविशी ' आणि ' शरदाचे चांदणे ' या दोन सदरांत अशा मुलाखती सादर करण्यात येतात. अशा दुहेरी मुलाखतींत आपोआपच जास्त नाट्य निर्माण होऊ शकते. एकच प्रश्न दोन भिन्न व्यक्तींना विचारला गेला आणि त्यांची दोन भिन्न उत्तरे मिळाली की साहजिकच प्रेक्षक/श्रोत्यांना एका गोष्टीबाबत दोन भिन्न दृष्टिकोण मिळतात. दोन व्यक्तिमत्त्वांची, दोन संदर्भांची तुलना करण्याची संधी मिळते, आणि त्यामुळे मानवी विचार व कृती यांबद्दल मर्मदृष्टी प्राप्त होऊन त्यांची जाणीव समृद्ध होते. त्यामुळे दुहेरी मुलाखतीत एक प्रकारचा चांगल्या अर्थाने, ताण निर्माण होतो. दुहेरी मुलाखती घेणाऱ्या मुलाखत्याची जबाबदारी त्यामुळे तेवढीच वाढते. कोणत्या दोन व्यक्तींना एकत्र आणावयाचे आणि त्यांना कोणते प्रश्न विचारायचे हे त्याला काळजीपूर्वक ठरवावे लागते. दूरदर्शनवरील काही दुहेरी मुलाखती खऱ्या अर्थाने दुहेरी नसतातच. त्या एकापाठोपाठ एक घेतलेल्या दोन भिन्न मुलाखती असतात इतकेच.

मुलाखत्याने विचारायच्या प्रश्नांचे चार प्रमुख प्रकार संभवतात. खुला प्रश्न, पर्याय संपवणारा प्रश्न, हो नाही एवढेच विचारणारा प्रश्न, आणि उत्तरकर्त्याने दिलेल्या उत्तराची खात्री करून घेणारा, ते उत्तर तपासून घेणारा प्रश्न. प्रश्न व त्यांचा क्रम पूर्वनिश्चित आहेत की नाही यावर मुलाखतींचेही दोन प्रकार करता येतील. पूर्वनिश्चित मुलाखत आणि मुक्त मुलाखत. ज्या समाजशास्त्रीय किंवा वृत्तपत्रीय पाहणीचा सुरवातीला उल्लेख केला ती अशी पुष्कळदा तयार प्रश्नावलीवर आधारलेली आणि म्हणून पूर्वनिश्चित वर्गात पडणारी असते. मुक्त मुलाखतही पूर्णतः मुक्त असते असे नाही. तिच्यातही उद्दिष्ट पूर्वनिश्चितच असते. त्या उद्दिष्टापर्यंत पोचण्याचा मार्ग मात्र उत्स्फूर्त क्रिया-प्रक्रियांच्या प्रकाशात शोधला जातो.

वेगवेगळ्या माध्यमात घ्यायच्या मुलाखतींसाठी वेगवेगळी कौशल्ये आणि गुणवत्ता

.....................................

* चांगल्या साहित्यिक मुलाखतीचे नमुने पाहायचे असतील तर डॉ. रणवीर रांग्रा यांचे ' साहित्यिक साक्षात्कार ' ( नयी दिल्ली : पूर्वोदय प्रकाशन, १९७८ ) हे पुस्तक पहावे. हिंदीमध्ये मुलाखतीला साक्षात्कार म्हणतात.—संपादक

लागते. जी मुलाखत लिहून काढावयाची असते त्या मुलाखतीच्या 'लेखका'ला संवाद-लेखनाचे कौशल्य, ओघवत्या लेखनाचे कौशल्य, तार्किक रचनेला किती महत्त्व द्यायचे याची समज, शब्दांमागील संकल्पनांच्या साहचर्य-क्षेत्राची समज यांची गरज असते. नभोवाणीवरच्या मुलाखत्याला योग्य त्या चढउतारांनिशी स्पष्ट शब्दोच्चार करण्याचे कौशल्य आणि ध्वनिवर्धक, ध्वनिमुद्रक इ. वापरण्याची माहिती आणि सवय यांची गरज असते. तर दूरचित्रवाणीवरच्या मुलाखत्याला कॅमेरा 'घेण्याची' (नाटकात नटाला प्रकाशझोत 'घेण्याची' असते तशी) सवय असावी लागते. म्हणजे कॅमेऱ्याच्या हालचाली आणि पल्ला यांचा त्याला अंदाज असावा लागतो. त्याचप्रमाणे कॅमेऱ्याच्या पट्टयात येणारी प्रत्येक हालचाल कॅमेरा अपरिहार्यपणाने टिपत असतो, याचे त्याला उत्तम भान असायला हवे. नाहीतर नाक चोळणे, कान खाजवणे यासारख्या प्रतिक्षिप्त क्रियांचे तो नकळत चित्रण करत राहातो आणि वेगळ्या अर्थाने प्रेक्षक/श्रोत्यांची करमणूक करतो.

पण सगळयाच माध्यमांतल्या मुलाखत्यांना आवश्यक गुणवत्ता म्हणजे अनुभव, सैद्धान्तिक ज्ञान, मनोविज्ञानाची समज, आणि मुलाखतमूर्तीला रस असणाऱ्या विषयाची चांगली माहिती. एकाच वेळी प्रश्न विचारणे, उत्तर ऐकणे, प्रश्नाचे व आपल्या विचाराचे विश्लेषण करणे, त्यात सुधारणा करीत जाणे, मुलाखतमूर्तींच्या उत्तराच्या आधारावर तिच्या प्रतिक्रियेची नोंद व विश्लेषण करणे इत्यादी अनेक अवधाने सांभाळण्याची कुवत मुलाखत्याच्या अंगी असली पाहिजे. जास्तीत जास्त संदर्भापासून मुलाखतीला प्रारंभ करून मुलाखतमूर्तीला विश्वासात घेत, खुलवत पुढे जाणे त्याला जमले पाहिजे. आपण अवघड व गुंतागुंतीचा प्रश्न विचारला तर आपल्याला उत्तरही अवघड व गुंतागुंतीचेच मिळण्याचा संभव असतो, हेही त्याने लक्षात घ्यायला हवे. असे उद्‌बोधक उत्तर देताना बोलणारा साहाजिकच मधे थोडा वेळ घेतो, उसंत घेतो, थबकतो. अशा वेळी त्याला मधेच तोडून पुढचा प्रश्न विचारणारा मुलाखत्या अडाणी आणि श्रोत्यांच्या शिव्याशापांना पात्र ठरतो! कुशल व अनुभवी मुलाखत्या अर्थात जाणून असतो की प्रश्नाच्या लायकीवर उत्तराची लायकी अवलंबून असते (लोकांच्या लायकीवर लोकशाहीची लायकी अवलंबून असते तशी!) वर्णनप्रधान व ठराविक साचाचा प्रश्न विचारला की उत्तरही वर्णन-प्रधान व ठराविक साचाचेच मिळणार! मुलाखतमूर्तींचेही प्रकार मुलाखत्याला माहीत हवेत. काही मुलाखतमूर्ती मुलाखतीच्या संधीचा आपली लोकप्रियता वाढविण्यासाठी उपयोग करून घेण्याचा डाव टाकतात (साधारणतः नट, लेखक या प्रकारात मोडतात.) त्याचप्रमाणे काही मुलाखतमूर्ती अल्पाक्षरी, व क्वचित घुम्या, असतात. पहिल्या प्रकारातल्या मुलाखतमूर्तींना कसे आवरायचे आणि दुसऱ्या प्रकारातल्या लोकांना कसे बोलते करायचे हे मुलाखत्याला कळायला हवे. अभ्यास, पूर्वतयारी

भाषिक कौशल्ये, प्रसंगावधान, हजरजबाबीपणा हे गुण त्याच्याकडे असायला हवेत, तसेच कठोर आत्मपरीक्षण करणे, आपल्या लेखनाचे / ध्वनिमुद्रणाचे वस्तुनिष्ठ संपादन करणे हेही त्याला जमायला हवे.

थोडक्यात ( आता निष्कर्षापर्यंत आलोच आपण ) मुलाखत हे संज्ञापनाच्या ( कम्युनिकेशन ) आणि पत्रकारितेच्या क्षेत्रातले एक प्रभावी साधन आहे. लहानग्या जॉर्ज वॉशिंग्टनच्या कुऱ्हाडीप्रमाणे ते निष्काळजीपणाने व बेजबाबदारीने वापरून चालणार नाही.

**संज्ञापन व वृत्तपत्रविद्या विभाग, पुणे विद्यापीठ, रानडे इन्स्टिट्यूट, पुणे ४११००४**

---

## सांगावा पुरस्कार

अल्पशिक्षित आणि नवसाक्षरांसाठी काढल्या जाणाऱ्या सांगावा या बातमीपत्राने ' सांगावा पुरस्कारा 'ची योजना जाहीर केली आहे. सांगावा पुरस्कार १००१ रु. असेल. जिल्हा, तालुका, व गाव पातळीवरून प्रसिद्ध होणाऱ्या पाक्षिक, साप्ताहिक, व दैनिकामधून प्रसिद्ध झालेल्या सर्वोत्कृष्ट बातमीस हा पुरस्कार दिला जाईल. सामाजिक प्रबोधन हा हेतू या पुरस्कारामागे आहे.

नियम : ( १ ) बातमी कमीत कमी दहा ओळींची असावी.

( २ ) बातमीचे स्वरूप ग्रामीण प्रश्नासंबंधी असावे.

( ३ ) भाषा सोपी असावी. अल्पशिक्षित, नवसाक्षरांना ती सहज वाचता आली पाहिजे. निरक्षरांना वाचून दाखवली तर समजली पाहिजे.

( ४ ) १५ ऑक्टोबर १९८३ ते १४ ऑक्टोबर १९८४ या कालावधीतील मराठीमधून प्रसिद्ध झालेली बातमीच पुरस्कारासाठी विचारात घेतली जाईल.

सूचना : ( १ ) बातमीचे कात्रण पाठविण्याची शेवटची मुदत १५ नोव्हेंबर १९८४ राहील. निकाल १० जानेवारी १९८५ पर्यंत प्रसिद्ध केला जाईल.

( २ ) संपादकाची शिफारस घेऊन बातमीदाराने कात्रणाच्या चार प्रती पाठवाव्यात. ( बातमीदार हा सेवक असला पाहिजे. )

( ३ ) संपादकांनी लिहिलेल्या बातमीचाही विचार केला जाईल.

( ४ ) स्पर्धेसाठी प्रवेश फी नाही.

( ५ ) ' सांगावा 'त प्रसिद्ध झालेल्या बातमीचा विचार स्पर्धेसाठी केला जाणार नाही.

संपर्क : इरगोंडा पाटील, संपादक सांगावा, द्वारा : सुप्रीम प्रोसेस, ४६१ / १ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

---





अनुक्रमणिका

# कनिष्ठ न्यायालयातील भाषांतर

डी. व्ही. देशपांडे

तालुक्याच्या ठिकाणची कनिष्ठ न्यायालये व जिल्हा न्यायालयांतून कज्जे चालविताना पुरावा हा मराठी व इंग्रजी अशा दोन्ही भाषांतून लिहिण्याची आपल्याकडे सामान्यतः प्रथा आहे. दिवाणी व फौजदारी अशा दोन्ही प्रकारच्या केसेसमध्ये ही प्रथा पालन केली जाते. या संदर्भात काही विचार व्यक्त करण्याचा प्रयत्न या लेखात केलेला आहे.

पुरावा नोंदणीची सध्याची ही पद्धती अत्यंत क्लिष्ट, वेळखाऊ व गैरसोयीची आहेच शिवाय ती सदोषही आहे. या पद्धतीनुसार साक्षीदारास तपासणीचे वेळी किंवा उलट तपासणी घेताना प्रश्न विचारला जातो व साक्षीदार प्रश्नाचे उत्तर देत असतो. हा प्रश्न-उत्तराचा संवाद नंतर वर्णनात्मक रीतीने बदलला जातो. एकीकडे शिरस्तेदार साक्षीदाराचे उत्तर वर्णनात्मक रीतीने लिहून घेत राहातो तर त्याचवेळी न्यायाधीश त्याचे इंग्रजीत भाषांतर करून स्वतः लिहून घेत असतो किंवा लेखनिकाला सांगत असतो.

अशा प्रकारे, न्यायालयात पुरावा नोंदवून घेत असताना, एकाचवेळी शिरस्तेदार व न्यायाधीश दोघांनाही काम करावे लागते. साक्षीदार पिंजऱ्यात येऊन उभा राहतो आणि वकिलाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर देतो. त्यानंतर त्याला व वकिलाला थांबावे लागते. कारण हा संवाद न्यायाधीशाला इंग्रजीत रूपांतरित करून स्वतः लिहावा लागतो किंवा लेखनिकाला सांगावा लागतो. त्याचवेळी शिरस्तेदारालाही हाच संवाद नीट ऐकावा लागतो. त्याचे भाषांतर करावे लागते व ते वर्णनात्मक रीतीने लिहावे लागते. न्यायाधीशाने लिहिलेल्या वर्णनाबरहुकूम आपले लिखाण होत आहे की नाही हेही त्याचवेळी त्याला दक्षतेने पहावे लागते.

प्रत्येक प्रश्नोत्तरानंतर अशा प्रकारे थांबणे, भाषांतर करून लिहून घेणे व नंतर पुढचा प्रश्न असा क्रम चालतो. अगदी वकिलाने जरी पिंजऱ्यातील साक्षीदारास प्रश्न विचारला तरी त्याचे त्वरित उत्तर क्वचितच मिळते. कारण वकिलाने प्रश्न विचारल्यावर साक्षिदार तो आधी नीट ऐकून घेतो. त्यावर त्याच्या शंका-कुशंका विचारून स्पष्टीकरण करून घेतो, त्यावर विचार करतो आणि नंतर सावकाशीने त्याचे उत्तर येते. हा एकूण प्रकारच अतिशय वेळखाऊ आणि त्रासदायक आहे. तद्दन गौण

स्वरूपाची माहिती नोंदवून घेण्यासाठी यामुळे वेळेचा फार अपव्यय होतो.

या सर्व प्रणालीबद्दल अगदी वेगळ्या दृष्टिकोणातून विचार करता येण्यासारखा आहे. सिव्हिल प्रोसिजर कोडनुसार पुराव्याची नोंदही कोर्टाच्या भाषेत करता येते व सि. प्रो. कोडच्या कलम १३७ अन्वये, कोर्टाची भाषा कोणती असावी हे राज्य सरकारने ठरवायचे असते. सदर कोडच्या कलम १३७ ( २ ) मध्ये, राज्य सरकारने न्यायालयांची भाषा कोणती असावी, हे जाहीर करावे, अशी खास तरतूदही आहे. सि. प्रो. कोडच्या ऑर्डर क्रमांक XVIII नियम ५ मध्येही अशा तरतूदी केलेल्या दिसून येतात. कलम १३८ अन्वये उच्च न्यायालय अशी अधिसूचना जारी करू शकते की ज्या द्वारे कोणतेही एखादे विशिष्ट कोर्ट इंग्रजी भाषेत पुराव्याच्या नोंदीचे काम करू शकेल. या तरतुदी, माझ्या मते, पुरेशा स्पष्ट आहेत. सि. प्रो. कोडच्या लेखकांनी कनिष्ठ न्यायालयांतील भाषांतर वगैरे बाबत काही चाकोरी सांगितलेली नाही.

महाराष्ट्र शासनाने अलीकडेच मराठी ही आपली कार्यालयीन कामकाजाची भाषा जाहीर केली असून मुंबई व्यतिरिक्तच्या महाराष्ट्रातील कोर्टामध्ये मराठी भाषेचा वापर सुरू झालेला आहे. पुराव्याच्या नोंदीसाठी न्यायालयात इंग्रजी व मराठी अशा दोन भाषांचा वापर सुरू आहे. परंतु माझ्या मते मराठीबरोबर इंग्रजीचा वापर चालू ठेवण्याची तशी काही खास कायदेशीर आवश्यकता दिसत नाही.—केवळ मराठी भाषेचा कनिष्ठ न्यायालयांतून वापर व्हावा, असे मी सुचवितो. पुराव्याची नोंद मराठी व इंग्रजीतून करण्याऐवजी कनिष्ठ कोर्टातून व ट्रायल कोर्टातून फक्त मराठीचा या दृष्टीने वापर केला जावा. वकिलांनी मराठीत प्रश्न विचारावेत व न्यायाधीशांनी त्यांची उत्तरे ऐकून ती शिरस्तेदारांना मराठीत लिहून घेण्यासाठी सांगावीत—अर्थात वर्णनात्मक रीतीने ! अशा रीतीने कनिष्ठ न्यायालयांमध्ये यापुढे इंग्रजी भाषांतर हा प्रकारच बंद व्हावा.

या पद्धतीचे अनेक फायदे संभवतात. ही पद्धत व्यावहारिक व सोयीस्कर आहे. आजही सहकारी न्यायालये, महसूल न्यायालये व तत्सम न्यायालयांमध्ये भाषांतर केले जात नाही व पुराव्याची नोंद ही वरीलप्रमाणे एकाच भाषेत होत असते. इंग्रजी ही अशा न्यायालयात 'अत्यावश्यक' नाही, हेच यावरून दिसून येईल.

यामुळे टंकलेखकाची गरज राहणार नाही, हा फायदा दुर्लक्षणीय नाही. आधीच न्यायालयांतून अपुरे कर्मचारी आहेत. त्यामुळे असणारे कर्मचारी अधिक कामासाठी वापरता येतील.

न्यायाधीशांवरील भाषांतराच्या त्रासदायक कामाचे ओझे कमी होईल. अनेकदा भाषांतरासाठी योग्य प्रतिशब्द उपलब्ध नसतात व काही वेळा साक्षीदाराच्या बोली-भाषेतील शब्दांमुळे अचूक भाषांतर करणेही शक्य होत नाही.

या पद्धतीमुळे कोर्टाचा वेळ खूपच वाचेल. इंग्रजी भाषांतराचा व्याप कमी

झाल्यामुळे पुरावा नोंदणीचे काम अतिशय त्वरेने झटपट होऊ शकेल. प्रयोगांती मी असे निरीक्षण केले आहे की, दिवाणी न्यायालयापेक्षा सहकार न्यायालये तेवढ्याच वेळात, दुप्पट पुरावा नोंदणीचे काम हातावेगळे करीत असतात. वेळेतील बचतीचे हे कार्य विविध प्रकारे होत असते. यामुळे न्यायाधीश, कारकून, वकील व दोन्ही बाजूंचे पक्षकार या सर्वांचाच वेळ वाचू शकतो. याचा अपरिहार्य परिणाम म्हणून कोर्टाची कामे हातावेगळी करण्याच्या वेगात वाढ होते व तेणेकरून प्रकरणे कोर्टात पडून राहणे, विलंब होणे हे टाळता येते.

एकाच प्रादेशिक भाषेचा वापर करणे हे अधिक अचूकही होईल. कारण या पद्धतीने न्यायाधीश स्वतः मजकूर शिरस्तेदारांस सांगतील व शिरस्तेदार फक्त उतरवून घेण्याचे काम करतील. सध्याच्या पद्धतीत, शिरस्तेदार स्वतःच्या मराठीत हे काम करीत आहेत. अशा प्रकारे, ही सर्वाधिक सुयोग्य व सोयिस्कर पद्धती ठरू शकेल. विशेषतः ग्रामीण विभागात ती चांगलीच परिणामकारक ठरेल.

या संबंधातील काही प्रश्नांचे स्पष्टीकरण करणे जरुरीचे आहे—मुंबईसारख्या ठिकाणी जेथे लोकांना मराठी समजणे सर्वसुलभ नाही तेथे कोणती पद्धती वापरावी? सि. प्रो. कोड, सेक्शन १३८ प्रमाणे हा प्रश्न उत्तम प्रकारे सोडविता येईल. मुंबईत व अन्यत्र जेथे मराठीचा वापर सुलभ होणार नाही, तेथे सध्याची मराठी व इंग्रजी भाषेत दुहेरी नोंदी करण्याची पद्धती चालू ठेवणे श्रेयस्कर ठरेल. परंतु तेवढ्याच मर्यादित प्रमाणात ती चालू ठेवणे योग्य होईल.

काही वेळा, काही टीकाकार असा आक्षेप घेतात की, कायद्याच्या अचूकतेच्या दृष्टीने व कायद्याचा योग्य अर्थ लावण्यासाठी इंग्रजी भाषा हीच अत्यंत अवश्यक आहे. विशेषतः कनिष्ठ न्यायालयातील प्रादेशिक भाषेत केलेल्या पुराव्याच्या नोंदींमुळे उच्च न्यायालयात अडचणी येऊ शकतील. या मताशी मी सहमत नाही. जिल्हा न्यायालयात होणाऱ्या पहिल्या अपिलापर्यंत तरी काहीच अडचण येऊ शकणार नाही. आजही जरी पुस्तकातून व कागदोपत्री इंग्रजीचा वापर असला तरी बहुतांश केसेसमधे मराठीतच युक्तिवाद केला जातो व त्यात कोणतीही अडचण वा गैरसोय जाणवत नाही.

उच्च न्यायालयातील अपिलाच्या पातळीवर, काही प्रमाणात, थोडीफार गैरसोय होण्याची शक्यता आहे. ही गोष्ट खरी, कारण उच्च न्यायालयांत मराठीचा वापर सामान्यभाषा म्हणून होत नाही व त्या पातळीवर कायदा व्यवहारासाठी इंग्रजी माध्यम अधिक योग्य ठरते.

परंतु त्यासाठी माझ्यामते आपण अतिशय व्यावहारिक उपाय योजावा. शासनाने उच्च न्यायालयात भाषांतरकार नेमावेत. त्यांनी मराठी पुराव्याचे इंग्रजीत रूपांतर करून ते उच्च न्यायालयाच्या संग्रहासाठी पाठवून द्यावे. कनिष्ठ न्यायालयात दाखल

होणाऱ्या कज्जांपैकी तुलनेने फारच थोडे कज्जे उच्च नायालयापर्यंत जातात, हे सर्वांनाच माहीत आहे. म्हणून, सध्याच्या कामाचे ओझे खूपसे कमी करण्याचा व्यावहारिक मार्ग म्हणून मराठीचा अंगीकार कनिष्ठ न्यायालयातून करणे हा उत्तम उपाय आहे. माझ्या मते, न्यायदानाच्या प्रशासनातील एक तातडीची गरज म्हणून उच्च न्यायालयाने ही उपयुक्त सुधारणा त्वरित अमलात आणली पाहिजे.

**२१३ यादो गोपाळ पेठ, सातारा ४१५००१**

[ याबद्दलची अलीकडची एक बातमी पान २६ वर पाहा. ]

---

## वाचालं करोति मूकं...

नऊ की दहा नंबर आठवत नाही पण हायकोर्टातल्या एका खोलीपर्यंत नेऊन उभं केलं. म्हणाले, " इथं आपली केस उभी राहणार आहे. तुम्ही इथंच थांबा. " आम्ही आज्ञाधारकपणे थांबलो.

अकरा वाजले—एकेक मिनिट अंगावर येत होतं.

आणि अचानक लोंढा यावा तसे एकेक काळा पायघोळ अंगरखा पांघरलेले वकील येऊ लागले. समोरच्या खोलीत न्यायमूर्ती खुर्चीवर येऊन बसले. त्यानंतर पंधरावीस मिनिटं इतर वकील आणि न्यायमूर्ती यांचंच काही तरी चाललेलं. आम्ही उभे होतो तिथं फार काही ऐकू येत नव्हतंच. बहुतेक पुढच्या तारखा मागितल्या जात असाव्यात पंधरावीस मिनिटांत निम्मं अधिक कोर्ट रिकामं झालं. मी आमच्या वकिलांच्या जितकं जवळ सरकता येईल तितका सरकून बसलो.

अशोक देसाई उभे राहिले. रात्री तयार झालेलं पेटिशन त्यांनी वाचलं. मग न्यायाधिशांनी काहीतरी पुटपुटल्यासारखं केलं—उत्तरादाखलं अशोक देसाई काही-तरी पुटपुटले. इतक्या जवळ बसूनही मला काहीही कळत नव्हतं. मग एक मोठा हशा झाला. अशोक देसाईंनी काहीतरी विनोद केला होता. आतापर्यंत गंभीर चेहरा करून बसलेल्या न्यायमूर्तींच्या चेहऱ्यावर स्मितरेषा उमटली. ते क्लार्ककडे वळले. काहीतरी पुटपुटले....मी ऐकण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतानाच अशोक देसाई कमरेत वाकले. " थँक्यू मिलॉर्ड " म्हणून चालायला लागले. त्यांच्या पाठोपाठ शृंगारपुरे. मी भांबावलेला, काय झालं कळलंच नव्हतं. केसचा निकाल केव्हा लागणार ?

मी शृंगारपुरेंना गाठलं. " काय झालं ? " " आपण जिंकलो. " " म्हणजे ? " " उद्याचे तिन्ही प्रयोग करायला कोर्टानं परवानगी दिली. " " कधी ! "

**कमलाकर सारंग, एक होता बाइंडर..., सखाराम बाइंडरचे दिवस या पुस्तकातून अक्षर दिवाळी अंक १९८३ मध्ये पूर्वप्रकाशित केलेल्या आठवणीमधून ( संक्षेपाने )**

---

# सरकारी नियमांचा मराठी अनुवाद : एक प्रतिक्रिया

**सत्त्वशीला सामंत**

[ गीता सुभाष भागवत, सरकारी नियमांचा मराठी अनुवाद : पडताळा पाहू, **भाषा आणि जीवन** १ : १. २७–८, जुलै १९८३ याला अनुलक्षून ]

नियम व कायदेकानू यांचा अनुवाद करताना मूळ नियमांचा काटेकोरपण व अनुवादभाषेचा डौल...या दोन्ही डगरींवर आपले पाय घट्ट रोवावे लागतात. एखादा नियम मुळात मराठीतून करणे व त्याचा मराठीत अनुवाद करणे या दोहोंमध्ये एक स्पष्ट सीमारेषा आहे. पहिल्या प्रकारात, नियम करणारा व ते त्या भाषेतून मांडणारा ही व्यक्ती एकच असते व त्यामुळे ती स्वतःच्या मनातील अभिप्राय उत्तम प्रकारे व्यक्त करू शकते. दुसऱ्या प्रकरणात, बहुधा या दोन वेगवेगळ्या व्यक्ती असतात. त्यामुळे अनुवाद करणाऱ्यावर तीन जबाबदाऱ्या येतात. ( १ ) मूळ नियम करणाऱ्याचा अभिप्राय नेमका काय त्याचे आकलन करणे, ( २ ) तो अभिप्राय अनुवादभाषेत काटेकोरपणे मांडणे, ( ३ ) त्याचवेळी अनुवाद भाषेचा डौल सांभाळणे. प्रस्तुत उदाहरणात काय झाले ते पाहू.

( १ ) पहिल्या शब्दनिष्ठ अनुवादात भाषेचा डौल तितकासा सांभाळला गेलेला नाही.

( २ ) दुसऱ्या अनुवादाच्या भाषेमध्ये सहजता आहे. पण काटेकोरपणाला ढळ पोचला आहे. कारण ‘ in accordance with the rules for the time being in force ’ या वाक्यांशाचा संबंध मुळात verity व determine या दोनही क्रियापदांशी आहे, तर अनुवादात तो फक्त ‘ पडताळणी ’ या शब्दाशी जोडलेला आहे.

अनुवादकाची जबाबदारी येथेच संपत नाही. नियम व कायदेकानू यांमध्ये वारंवार दुरुस्त्या होत असतात. सध्याची परिस्थिती अशी आहे की, प्रथम इंग्रजी कायदा दुरुस्त होतो व नंतर मराठी अनुवादात दुरुस्ती होते. मूळ अनुवाद जर पुष्कळ भाषा-स्वातंत्र्य घेऊन केलेला असेल तर, अनुवादात दुरुस्त्या करणाराची जबाबदारी वाढते, त्याला बरीच अवधाने सांभाळावी लागतात व बहुधा एखाद्या ठिकाणी दुरुस्ती करण्याचे राहून जाते. परिणामी, अनुवाद कितीही सुभग असला तरी, त्यात अर्थाची





अनुक्रमणिका

हानी झाली असल्याने तो व्यर्थ ठरतो. (म्हणूनच कायद्याचा अनुवाद हा मूळ कायद्याइतकाच अधिकृत ठरवणे धोक्याचे असते.)

म्हणून कायद्याचा अनुवाद करताना, शक्य तो चुकांना वाव राहू नये यासाठी प्रथमतः अर्थनिष्ठता, त्यानंतर शब्दनिष्ठता व मागाहून भाषा-सौंदर्य हा तत्त्वक्रम पाळून भाषांतर करणे अपरिहार्य ठरते. सदर नियमाचा पुढील अनुवाद पाहावा —

१. एखादा शासकीय कर्मचारी

(क) राजपत्रित अधिकारी असेल तर त्याची वीस वर्षांची सेवा पूर्ण झाल्यावर लेखापरीक्षा अधिकारी हा, अथवा

(ख) अराजपत्रित कर्मचारी असेल तर त्याची पंचवीस वर्षांची सेवा पूर्ण झाल्यावर, लेखापरीक्षा अधिकाऱ्याशी विचारविनिमय करून कार्यालय प्रमुख हा,

त्या त्या काळी अंमलात असलेल्या नियमांनुसार, अशा कर्मचाऱ्याची झालेली सेवा पडताळून पाहील. त्यापैकी अर्हकारी सेवा किती ते निर्धारित करील व याप्रमाणे निर्धारित केलेल्या अर्हकारी सेवेचा कालावधी त्या कर्मचाऱ्याला नमुना २२ मध्ये कळवील."

**विभागीय सहायक संचालक, भाषा-संचालनालय, पुणे ४११००१**

---

**काम चालू रस्ता अजूनही बंद**

महाराष्ट्राचे शिक्षणमंत्री श्री. सुधाकर नाईक यांनी दिल्ली येथे संसदीय राजभाषा समितीपुढे २७·१०·१९८३ रोजी मराठी ही राजभाषा करण्याबद्दल झालेली प्रगती मांडताना सांगितले की सहा महिन्यांच्या अवधीत जिल्हान्यायालयांतील सर्व कामकाज व निकालपत्रे मराठीतून राहावी यासाठी राज्यसरकार प्रयत्न करीत आहे. त्याचप्रमाणे विधेयके मराठी मांडण्याबद्दलही सरकारचे प्रयत्न चालू असल्याचे त्यांनी सांगितले.

वृत्तः **महाराष्ट्र टाइम्स**, २९·१०·१९८३, पृ. ७.

---

**इंग्रजीत रे कशाला बोलतोस!**

ढाक्यामधली गोष्ट. एका बांगलादेशी माणसाला सायकलरिक्षा ठरवायची आहे. "बिश्शोबिद्दालॉये चॉलो !" तो विचारतो. रिक्षावाल्याच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह. "यूनिवार्सिटि." या स्पष्टीकरणावर रिक्षावाल्याची प्रतिक्रिया : "ताय कॉन इंग्राजी कोयूतासिलेन कॅन् !"

**बांगला देशात सांगितला जाणारा चुटका**

---

# मराठी आडनावे

रामगोपाल सोनी

मराठी आडनावे हा मराठी भाषिकांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय तर आहेच, शिवाय मराठी आडनावाच्या विकासाची कथाही अत्यंत मनोरंजक आहे. भारताच्या इतर कोणत्याही प्रदेशात आडनावांची इतकी विविधता सापडत नाही. या विविधतेतच महाराष्ट्रीय संस्कृतीचे वैशिष्ट्य आहे. महाराष्ट्रात अनेक जाती, वंश, व अनेक संस्कृती यांचे आगमन व मिश्रण झालेले आहे. या मिश्र संस्कृतीचा प्रभाव आडनावावरही झालेला दिसतो. मराठी आडनावाचा कोश अत्यंत समृद्ध व गौरवशाली आहे. या आडनावांमध्ये महाराष्ट्राची भाषा समाजरचना, व संस्कृती प्रकट झालेली आहे.

भारतीय आडनावांच्या इतिहासाची सुरुवात वेदकाळापासून झालेली आहे. वेदाध्ययन आणि याज्ञिक क्रियांच्या आधारावर द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी, पाठी, द्विपाठी, त्रिपाठी, अग्निहोत्री, दीक्षित, पाठक, श्रोत्रीय, अवधानी, सामवेदी, ऋग्वेदी आदि पदव्यांचे प्रचलन झाले. वेद, वेदांग, ब्राह्मण, आरण्यक, उपनिषद, पुराण आदिपर्यंत या पदव्यांचे प्रचलन होते. मनुस्मृतीत वर्णांच्या आधारावर आडनावांचा कसा उपयोग करावा याविषयी माहिती आलेली आहे.

"शर्मा वेदज्ञ विप्रस्य वर्मा त्राता च भूभुजाम्।
भूतिर्दत्तश्च वैश्यस्य दासः शूद्रस्य कारयेत्।"

इतिहासाचार्य राजवाडे महाराष्ट्रीय आडनावांची उत्पत्ती गोत्राच्या नावापासून झाली असे मानतात. ते बहुतेक आडनावाचा संबंध नागकुलाशी जोडतात. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर आदि विद्वानांनी राजवाड्यांच्या ह्या मताला विरोध दाखवला असून या आडनावांना अर्वाचीन मानलेले आहे. काही आडनावे ही गोत्रांच्या नावापासून निर्माण झालेली आहेत. काही प्राचीन राजकुलांची नावे ही आडनावे म्हणून झालेली आहेत. उदा. सूर्यवंशी, यादव, जाधव, चव्हाण ( चाहमान ) चौहान, पवार ( परमार ), तंवर ( तोमर ), सुर्वे ( सूर्यवंशी ), सोमवे ( सोमवंशी ), कदम (कदंब), शेलार व शेलारे ( शिलाहार ), राठोड ( राष्ट्रकूट ), पालवे ( पल्लव ), चालके–चलके





अनुक्रमणिका

( चालुक्य ), गुर्जर व गुजर, सिसोदे ( सिसौदिया ) भोसले, शिंदे, गायकवाड' होळकर, सतके ( सात्यकि ), शेन्दरे ( सेंद्रक ), खरात व खराते ( क्षहरात ), सातपुते ( सप्तिपुत्त ) इत्यादी राजकुलांची ही नावे विशेषकरून मराठा क्षत्रियांच्या आडनावांमध्ये सापडतात. आणि ही आडनावे लावणारे स्वतःला या राजकुलाचे वंशज मानतात.

आडनावांची माहिती प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृतीच्या सामग्रीत आहे. त्यावेळच्या समाजरचनेचे रीतिरिवाजांचे, भाषेचे स्वरूप कळते. यात विशेषतः ब्राह्मण समाजातील नावे, आडनावे तशीच अधिकाऱ्यांची नावे मिळतात. परंपरेनुसार प्रत्येक राजा ब्राह्मणांना दान देतेवेळी त्या ब्राह्मणाचे नाव, आडनाव, राज्याच्या कर गोळा करणाऱ्या अधिकाऱ्याचे नाव ताम्रपटात लिहित असे. त्यामागचा उद्देश एवढाच होता की राज्याच्या अधिकाऱ्याने दान दिलेल्या भूमीचा कर वसूल करू नये व ज्याला दान मिळाले त्याला त्याचा पूर्ण अधिकार प्राप्त व्हावा. दीक्षित हे आडनावांच्या उल्लेखाच्या दृष्टीने सगळ्यात प्राचीन आहे. त्या आडनावाचा उल्लेख इ. स. ४६३-६४ च्या जयनाथाच्या करतलाई ताम्रपटात मिळतो. दुसरे आडनाव 'वर्मन' हे आहे याचा काळ ५६० चा आहे. ६१२ च्या एका दानपत्रात महाराष्ट्रीय प्रवृत्तीच्या स्थानसूचक आडनावाचा उल्लेख मिळतो. हे दानपत्र चालुक्य नरेश .पुलकेशी द्वितीय याचे आहे.

"वसिष्ठगोत्राय तैत्तिरीयाय तगराधिवासिने चतुर्वेदाय वरखेड कुलनामधेयाय ज्येष्ठ शर्मणे।" या दानपत्रात वरखेड हे कुलनामाच्या रूपात उपयोगात आणले गेले आहे. ही पद्धती कर्नाटकातील आहे. कर्नाटकात स्थाननामालाच आडनावाच्या रूपात उपयोगात आणले जाते व हे नाव व्यक्तिनामाच्या आधी येते. ह्या ताम्रपत्रावरून हे सिद्ध होते की स्थाननाम कुलनाम म्हणून लिहिण्याची प्रथा ७ व्या शतकापूर्वीही आलेली होती. हे वरखेड ( उमरखेड ) गाव परभणी जिल्ह्यातील असून या ताम्रपटात चतुर्वेदी त्याचप्रमाणे शर्मा या नावांचा पण उपयोग केलेला आढळून येतो. त्याचप्रकारे दामदीक्षित ( सन ६३० ), कुप्पशर्मन ( ६४२ ), चतुर्वेदी ( ६६३ ), गृहीतसहस्र ( ६९६–७३३ ), उदुम्बर ( भवभूतीचे आडनाव, ७००–७२० ), हेडावुंक हेडाऊ ( ७३६ ), द्विवेदी, चतुर्वेदी ( ८०६ ), गहियसाहस ( ८०८ ), शर्मा-द्रोणशर्मा ( ७६६–८४३ ), उपाध्या, पंडित, पंडितराय, भट-उपाध्या, भागवत ( ८७१ ), सेणुई ( १०१२ ), द्विवेद, ठक्कुर, अवस्थी ( १०४४ ), घैसास ( १०६६), साहणी, सामंत, ठाकुर, परब ( प्रभू ), प्रधानु, मुंजेय ( १०८६ ), भट-उपाध्ये, गावणू, नार्गावुंडा ( ११५० ), पटकीत, महाजन ( ११६३ ), द्विवेदी, चतुर्वेदी, अग्निहोत्री, श्रोत्रीय, पंडित, ठाकुर, राऊत ( ११६६), कुलकरणि (१२१२), प्रभू, देसाई, नायक म्हात्रे, गुरव, जोशी, कोठारी, सोवनी, कामत, पुराणिक, धर्माधिकारी, देवल, महाजन

भोपे, पुजारी इत्यादी आडनावांचा उल्लेख ताम्रपटावर सापडतो. त्यात गोत्रनामांचा पण उल्लेख केलेला आढळतो. यादव राजा कृष्ण याच्या बेंडेगिरी ताम्रपटात ( १२४९-५० ) काही आडनावांचा उल्लेख आलेला आहे. आचार्य, भट, दीक्षित, द्विवेदी, वैसास, पंडित, पाठक, पटवर्धन, स्वामी, उपाध्याय आदि आडनावाचा उल्लेख आलेला आहे. या आडनावांव्यतिरिक्त वेदाध्ययनसूचक आडनावे पण आली आहेत. ती म्हणजे भागवत, ब्रह्मज्ञानी, दशग्रंथी, सामवेदी, सर्वज्ञानसारस्वतभंडार इत्यादी. अण्णिगिरी, गोकागे, गणगनूर, वाराणसी आदि ग्रामसूचक आडनावे पण यात आलेली आहेत. यावरून असे म्हणता येईल की आडनावांचे प्रचलन ५ व्या शतकापासून सुरू झाले होते.

महाराष्ट्रीय आडनावे प्रवृत्तिमूलक आहेत. कारण की, अशा प्रकारच्या आडनावांत महाराष्ट्राचे अंतरंगजीवन चित्रित झाले आहे. महाराष्ट्रात विचित्र आडनावे ठेवण्याची विचित्र प्रवृत्ती दिसून येते. त्यात महाराष्ट्राची स्वातंत्र्यप्रियता, नावीन्यप्रियता, तसेच शोधक प्रवृत्ती यांचे प्रतीक आढळते. याच प्रवृत्तीमुळे आडनावात विचित्रता, विविधता तसेच अनेक रूपांचे दर्शन होते. (विचित्र आडनावांची उदाहरणे नंतर दिली आहेत.) अशा प्रकारच्या आडनावात महाराष्ट्राची संस्कृती, सभ्यता आणि विचारसरणी आढळून येते.

महाराष्ट्रातील आडनावांची संख्या फारच मोठी आहे. महाराष्ट्रीयन माणसांएवढी भिन्न भिन्न आडनावे असणारी जमात पृथ्वीतलावर दुसरी नसावी. आपले ‘ स्व ’ त्व व वैशिष्ट्य जपणे ह्या खास मराठी स्वभावामुळेच एवढी आडनावे तयार झाली असावीत. रातेंड हंटफोर्डने ‘ स्वीडन देशाची लोकसंख्या ७५ लाखांपैकी एक तृतीयांश भागापेक्षा जास्त भागात एकूण सर्व मिळून फक्त १९ प्रकारांपर्यंतच आडनावे आहेत. असा निष्कर्ष काढला आहे. मिळालेल्या साहित्यावरून महाराष्ट्रातील आडनावांचे प्रवृत्तिमूलक वर्गीकरण खालीलप्रमाणे आहे. ( काही आडनावे एकापेक्षा अधिक वर्गात पडली आहेत. )

१. स्थानवाचक ( भौगोलिक ) : मुंबईकर, नागपुरे, सावरकर, आगरकर, चिपळूणकर, मुळगावकर, रामटेके, वैरागडे, सासवडे, इन्दापूरकर, प्रियोळकर, पिंपळापुरे, गजेंद्रगडकर, चिमूरकर इत्यादी.

२. व्यवसायदर्शक : गाजरे, कुंभारे, लोखंडे, सोनारे, फुलकर, फूलमाळी, रत्नपारखी, वनमाली, जोशी, सराफ, दलाल, वाढई, नक्षिने, चांभारे, हरकरे इ.

३. धार्मिक क्रियाकांडसूचक : आचार्य, शास्त्री, उपाध्ये, पाध्ये, हरदास, पांचकळशी, दीक्षित, यज्ञे, याज्ञिक, पाठक, फूलबडुआ. उकिडवे, बारापात्रे, धार्मिक गुरुमुखी इ.

४. घटना व कृतिदर्शक : घोडीचोरे, वाघमारे, गोडबोले, ताकसांडे, काटे,

जीभकाटे, गोटेफोडे, डोईफोडे, आगलावे, नाकतोडे, माणूसमारे, गोतमारे, कढीखाये इ. ( नाम आणि क्रियापदे मिळून ही सामान्यतः बनलेली दिसतात. )

५. गोत्र व प्रवरदर्शक : गर्गे, अत्रे, गौतम, विश्वामित्र, कपिले, वैशंपायन, याज्ञवल्क्य, पाराशरे, कौशिक, भारदे, भार्गव. मैत्रे इ.

६. देवी देवतांच्या नावावरून बनलेली : ब्रह्मे, विधाते, चतुरानन, मदन, अनंग, कालभैरव, पुरंदरे, श्रीसुन्दर, प्रभु, विराट, चितानंद, शारंगपाणी इ.

७. संप्रदायदर्शक : वैष्णव, भागवत, स्मार्त, नाथ, उदास किंवा उदासी, अवधूत वारकरी इ.

८. पदवीसूचक : रणदिवे, रणखांबे, अतुलबली, धीर, अचल, बुद्धिसागर, विद्यासागर, कविमंडन, ज्ञानवंत, अवधानी, परोपकारी, दातार, धनेश्वर, शिरसाव इ.

९. पद व अधिकारसूचक : गडकरी, किल्लेदार, दळवी, मंत्री, दिवाण, चक्रवर्ती, छत्रपती, सावंत, राव, पेशवे, उमराव, फडणीस, खासनीस, पाटील, कुलकरणी, कर्णिक, देसाई, सरदेसाई, पांडे, देशपांडे, घाटपांडे, पांढरीपांडे, देशमुख, सरनौबत, मुजुमदार इ.

१०. राजकुलसूचक : सूर्यवंशी, सोमवंशी, जाधव, गायकवाड, कदम, शिलारे, चालुक्य, बुंदेले, बघेल, होळकर, शिंदे इ.

११. व्यक्तिनामावरून बनलेली : बिंदू, विश्वासराव, बापभट ( बापट ), निर्मल, मायदेव, मैराळ, कल्याणराव इ.

१२. साहित्य आणि कलासूचक : अभंगे, नाटके, निबंधे, विज्ञाने, चित्रकारी, चितारी, गायक.

१३. कालसूचक : शनवारे, संवत्सरे.

१४. जातिसूचक : गुर्जर, मराठे, रजपूत, ठाकूर इ.

१५. वर्णनात्मक : या प्रकारच्या आडनावात आडनाव धारण करणारांबद्दल स्नेहात्मक ( स्नेह, प्रेम ) तसेच विरागात्मक ( व्यंग्य, घृणा, द्वेष, ईर्ष्या ) दोन्ही प्रवृत्ती आढळतात—

( क ) निंदाव्यंजक : पावडे, घोडमुखे, विध्वंसे, लफंगे, आगलावे, घरबुडवे इ.

( ख ) शारीरिक दोषदर्शक : पोटदुखे, खोकले, रोडे, बहिरट, हगवणे इ.

( ग ) वर्णदर्शक : काळे, गोरे, हिरवे, पिवळे, तांबडे, पांढरे इ.

( घ ) स्वभावदर्शक : रागीट, तापटे, तुफाने, बाताडे, उदार, भडभडे, गोडबोले इ.

( ङ ) आकृतिदर्शक : लांबे, गिड्डे, तिरवटे, नकटे, एकबोटे, लहाने, सहाने इ.

१६. प्राणिवाचक: किडे, मकोडे, मुंगे, माकोडे, सिंह, वाघ, लांडगे, कोल्हे, रेडे, घोडे, गाढवे, कावळे, हंस, मयूर, राजहंस, मत्से, ढोरे, हरणे, कुचे, चक्रवाक, काळवीट,

अस्वले, नाग.

१७. पदार्थसूचक : साखरे, तेले, कस्तुरे, सोने, सुवर्ण, तांबे, पितळे, बोंडे, दहिवडे, वडाभात, श्रीखंडे, तुपे, कापडे, फुटाणे इ.

१८. निसर्गसूचक : पहाडे, पर्वते, डोंगरे, घाटे, शिखरे, समुद्रे, झाडे, मोगरे, पळसे, ढगे, फुले, कुरणे इ.

१९ वाहनदर्शक : घोडेस्वार, सारथी, गाडीवान, पालखीवाले, रिंगे, मृगवाहन, घोडचढे इ.

२०. संबंधसूचक : नातू, पित्रे, नवरे, दहाससरे, अष्टपुत्रे, दशपुत्रे, सातपुते, बारापुते, महाकुते, लेकुरवाळे इ.

२१. संख्यासूचक : पन्नासे, साठे, हजारे, लाखे, सवालाखे, करोडे इ.

२२. वेषभूषासूचक : पोलके, धोतरे, पगडी, पीतांबर, बुचे, पागुडे, बाशिंग इ. (पोलका शब्द इंग्रजीवरून आला आहे हे लक्षात घ्यावे.)

२३. आयुध व अवजारसूचक : तलवारे, चक्रे, बाणदार, धनुर्धारी, गोलंदाज तोफखाने इ.

२४. स्वामित्वसूचक : खानवाले. टंकीवाले, अंटावाले, बंबावाले, तुळशीबागवाले, लड्डूवाले, एकताटे इ.

२५. अन्य प्रातातून आगमन सुचवणारी : कन्नमवार (कन्नमवारु), अन्नमवार किंवा अणे, कोतपल्लीवार (आंध्र), मथुरे, बनारसे, वाराणशीवार, बंगाले, बंगालकर, कानपुरे, कानडे, रजपूत, देहलीवाले, काशीकर, म्हैसूरकर इ.

२६. अश्लील आडनावे : हगे, मुते, गानफारे, गांडखाजवे, गांडपुसे, शौचे, झवकिरे, लवडे, गांडकाटे, सुरते इ.

अशाप्रकारे या आडनावांत महाराष्ट्रातील गावे, शहरे, व्यवसाय, धर्म, सम्प्रदाय, अधिकारी तसेच निरनिराळ्या मनोभावांचे चित्र आढळून येते. थोडक्यात म्हणावयाचे झाल्यास आडनावे ही देशाचे व समाजाचे आरसे आहेत. या प्रकारच्या आडनावात भारतीय संस्कृती दडलेली आहे. निरनिराळ्या प्रवृत्तींची आडनावे जीवनाच्या निरनिराळ्या प्रकारचे दर्शन घडवतात. त्याचे विवेचन येथे करणे शक्य नाही. एक एक प्रवृत्ती घेऊन स्वतंत्र निबंध लिहिणे शक्य आहे.

### जिज्ञासूंसाठी टिपण

अभ्यासकांच्या सोयीसाठी उदाहरणादाखल घेतलेल्या आडनावांचे लेखन जुन्या पद्धतीने केले आहे. लेखकाला उपयोगी पडलेले संदर्भ पुढे दिले आहेत.

अग्रवाल, वासुदेवशरण. पाणिनिकाल भारतवर्ष, विक्रम संवत २०१२.

अत्रे, त्रिं. ना. गावगाडा, १९५३.

उपाध्याय वासुदेव. प्राचीन भारतीय अभिलेखों का अध्ययन, १९६३
जोशी, शंकर नारायण. मराठेकालीन समाजदर्शन, १९६०.
तुळपुळे, शं. गो. प्राचीन मराठी कोरीव लेख, १९६३
बनहट्टी, श्री. ना. ( संपादक ) आज्ञापत्र
माटे, श्री. म. विचारमंथन, १९६४.
मिराशी, वासुदेव विष्णू. संशोधन मुक्तावली, सर तिसरा १९५८.
विभु, विद्याभूषण. अभिधान अनुशीलन, १९५८. ( हिंदी भाषेत. )
सोनी, रामगोपाल. महाराष्ट्रीय कुलाभिधानोंका भाषावैज्ञानिक और सांस्कृतिक अनुशीलन–नागपूर विद्यापीठ पी-एच.डी. प्रबंध, १९७०. ( अप्रकाशित )
Barber, H. British Family Names. 1903.
Corpus Inscriptionum Indicarum. 1963.
Epigraphica Carnatica. Vol. 4 1898.
Epigraphica Indica, Vol. 18.
Gardiner, Alan. The Theory of Proper Names 1954, page 25.
Malasekara G. B. Dictionary of Pali Proper Names, 1937.

४१ डागा लेआउट, उत्तर अंबाझरी मार्ग, नागपूर ४४००१०

---

**देशाचे देणे**

प्रत्येक सर्जनशील लेखक आपल्या देशाचे एक देणे लागतो, आणि ते म्हणजे त्याने आपली कुवत आणि कल ओळखून किमान एका परकी कृतीचे भाषांतर करून स्वकीय साहित्य समृद्ध करायचे हे.

**आंद्रे झीद** ( फ्रेंच कादंबरीकार १८६९–१९५१ )

---

# बंगी

## श्री. बा. जोशी

'**भाषा आणि जीवन**' १:१, जुलै १९८३ मधील 'शंका आणि समाधान' (पृ. ३९) या सदरात 'बंगी' (पार्सल या अर्थी) या शब्दाची व्युत्पत्ती कुणा जिज्ञासूला हवी असल्याचे समजल्याने चटकन उपलब्ध झालेल्या माहितीचे टिपण पुढे देत आहे.

हा शब्द मूळ संस्कृतमधील 'विहंगिका' शब्दावरून आला असल्याचा बहुतेक कोशकारांचा निर्वाळा आढळला 'विहंगिका' म्हणजे 'खांद्यावर आडवी धरून, दोन्ही टोकास तराजूच्या पारड्यांसारखी दोन शिंकी अडकावयाची सोय केलेली बांबूची काठी', 'भारयष्टिः इत्यमरः' असाही हवाला आढळला. वा. शि. आपटे यांच्या संस्कृत कोशात विहंगमा, विहंगमिका असेही पर्याय दिले आहेत.

महाराष्ट्र शब्दकोशात 'बाहेरगावी रेल्वे-पोस्टामार्फत पाठवण्यासाठी माल भरून तोंड शिवलेला करंडा, पुडके' असा अर्थ दिला असून हिंदीतील 'बहन्गी' (वह-वाहणे, वाहून नेणे) शब्दाचा निर्देश केला आहे.

बंगालीतही हा शब्द रूढ होता. बंगाली शब्दकोशातील खुलासेही वरील व्युत्पत्तीस पुष्टी देणारे आहेत. यूल बर्नेल यांच्या 'हॉब्सन-जॉब्सन' कोशात (पृ. ६० वि. क्रुक कृत सुधारित आ. १९६८) १७४९ पासून १८७३ पर्यंतची या शब्दाच्या वापराची उदाहरणे विविध इंग्रजी खलिते, पुस्तके, दस्तऐवज यातून उद्धृत केली आहेत. डाक-बंगी, बंगी बरदार या साधित शब्दांचाही त्यात उल्लेख आहे.

य. न. केळकर यांच्या 'ऐतिहासिक शब्दकोश' (पुणे १९६२) ग्रंथाच्या दुसऱ्या खंडातही या शब्दाच्या जुन्या उपयोगाची उदाहरणे आढळतात. "बंगी—करंडी, टोपली, पेटारा" असा अर्थ देऊन (पृ. ८७८) कोशकार 'पुणे अखबार' खंड ३, पृ. ५८ वरील अवतरण उदाहरणादाखल देतात : "ममईस इंग्रजांचे वकिलानी काही मेवा वगैरेच्या बंग्या पाठविल्या."

या शब्दाचे मराठीतही अन्य पर्याय रूढ होते असे दिसते. त्यांपैकी एक म्हणजे 'बंदगी' (केळकर १९६२ पृ. ८८७). त्याचा अर्थ 'गाठोडे' असा देऊन 'दोन बंदग्या दाळिंबे गुजरली' असे उदाहरण राजवाडे, खंड ७, पृ. १३३ वरून घेतले

आहे. दुसरा पर्याय ' बहंगी '. त्याचा करंडी, पिशवी असा अर्थ देऊन ( केळकर १९६२ पृ. ९११ ) " त्याजकडेही दहीपोहे, लोणची, पापड, वडे ऐशा वहंग्या भरून शागीर्दाहाती पाठवून दिल्या. " असे उदाहरण ' होळकरांची कैफियत, पृ. ७३ ' वरून उद्धृत केले आहे.

वरील टाचणावरून ध्यानी येईल की आरंभी ' खांद्यावरील कावडीची आधार-काठी ' असा असणारा या शब्दाचा अर्थ लोप पावून, कावडीत अथवा पारड्यात भरलेला माल, करंडा, पेटारा असा अर्थ रूढ झाला व त्याहीनंतर ' परगावी पाठविण्याची चीजवस्तू, गाठोडे, पार्सल ' असा अर्थ ( मग ती वस्तू रेल्वेने अथवा मोटारीने का पाठविली असेना ) प्रचलित झाला. आजकाल तर या शब्दाचा प्रयोग विरळाच आढळतो.

१२९ सेंट्रल गव्हर्नमेंट फ्लॅट्स्, अलीपूर, कलकत्ता ७०००२७

---



---

# वैखरी : सकस वैचारिक लेखन

**वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार. लेखक : अशोक रा. केळकर. मुंबई : मॅजेस्टिक बुक स्टॉल, १९८३. ४; २९५ पृष्ठे. ५० रुपये.**

**परीक्षणलेखक : रमेश वा. धोंगडे**

वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार हा डॉ. अशोक केळकरांचा भाषा या विषयावरील लेखांचा पहिला संग्रह. हा पहिला असला तरी त्यात पहिलेपणाच्या खुणा नाहीत. याचे कारण केळकर इंग्रजी आणि मराठी लेखनात नवखे नाहीत आणि भाषाविज्ञानातील त्यांचा अधिकार सिद्ध झालेला आहे. या पुस्तकाचे खास स्वागत अशासाठी व्हावयास हवे की भाषाविज्ञानावरचे इतके सकस लिखाण मराठीतच काय पण अन्य भारतीय भाषांतही सापडणे फार दुर्मिळ. केळकरांनी हे सर्व लेख इंग्रजीत लिहिले असते तरी या पुस्तकाचे सर्वत्र स्वागतच झाले असते. मराठी भाषिकांसाठी मुद्दाम मराठीत लेखन करण्याच्या या प्रयत्नाचे वाचकांनी स्वागत करावे, विद्वानांनी अनुकरण करावे, आणि केळकरांच्या शब्दातील 'इंग्रजीधार्जिण्यां'नी या प्रयत्नापासून बोध घ्यावा.

यातील पहिले सहा लेख हे .भाषाविज्ञानाची सैद्धान्तिक भूमिका आणि भाषेच्या विविध अंगांचा विचार करणारे आहेत. 'आधुनिक भाषाविज्ञानाची परंपरा' यातील पाणिनीचे भाषाविज्ञान, पाश्चात्त्य ऐतिहासिक भाषाविज्ञान, रचनावादी भाषाविज्ञान आणि चॉम्स्कीचे भाषाविज्ञान यांचा आढावा महत्त्वाचा आहे. केळकर नुसता इतिहास सांगत नाहीत; विचारांची वाढ आणि दिशा यांचा सम्यक्‌पणे आढावा घेतात. 'भाषेचे नियोजन' या लेखात भाषा ही राष्ट्राची साधनसंपत्ती असून तिचे नियोजन तज्ज्ञांकरवी डोळसपणे झाले पाहिजे असे केळकर आवर्जून सांगतात. अर्थात केळकरांची भूमिका भाषावैज्ञानिकाची आहे. भाषा नियोजनात राजकीय आणि सामाजिक शक्ती कार्यरत असणे अटळ आहे. त्यांचे नियोजन कसे करता येईल याचा विचार महत्त्वाचा असला तरी केळकरांच्या कक्षेबाहेरचा आहे. 'भाषेचे नियमन' या लेखात सुसंस्कृत समाजाला प्रमाण भाषेची कशी आवश्यकता आहे, प्रमाण भाषा म्हणजे मूठभर (फॅशनेबल मराठीत 'साडेतीन टक्के') लोकांची मिरासदारी हा समज कसा भ्रामक

आहे याचे फार मार्मिक विवेचन आहे.

वैखरीच्या दुसऱ्या भागात आठ लेख आहेत आणि ते मराठी भाषेसंबंधी आहेत. मराठीची राजभाषा म्हणून कशी वाढ करता येईल, मराठीत पारिभाषिक शब्द वापरताना कोणती सूत्रे वापरता येतील, शिक्षणांत मराठी माध्यम का असावे, मराठीचा अभिमान म्हणजे इंग्रजीचा दुस्वास कसा नाही, संस्कृतचा अभ्यास काहीएक निश्चित हेतूंसाठी करणे इष्ट असले तरी संस्कृतचे आंधळे प्रेम कसे मारक आहे, आदिवासींना दोनदा साक्षर करणे कसे आवश्यक आहे, मराठीचे भाषाशिक्षण म्हणजे केवळ मराठी साहित्याचे अध्यापन नव्हे असे कितीतरी महत्त्वाचे विचार या भागात केळकरांनी मांडले आहेत. या वैचारिक लेखनाला चुरचुरीतपणा आला आहे तो मराठी माणसाचे आळशीपणाबाबत, मराठीच्या अध्यापकांच्या आत्मसंतुष्टतेबाबत, संस्कृतच्या विद्वानांच्या यांत्रिक पढीकपणाबाबत, पालकांच्या मुलांच्या शिक्षणविषयक आग्रहाबाबत त्यांनी मारलेल्या कोपरखळ्यांनी. अर्थात अनेकदा प्रश्नाचा सर्व बाजूंनी विचार करण्यात केळकर ठाम भूमिका घेत नाहीत—विशेषतः सद्यःस्थितीला ठोकपणे सामोरे जात नाहीत असे कधी कधी वाटते. मात्र केळकरांची समन्वयवादी भूमिका ही असहायतेतून आलेली नाही. विचारांच्या संपृक्ततेतून आलेली आहे.

वैखरीच्या तिसऱ्या भागात चार लेख आहेत. हे उपयोजित भाषाविज्ञानाच्या दृष्टिकोणातून मराठीच्या काही प्रश्नांचे विश्लेषण करतात. ‘ मराठी व्याकरणाची नवी दिशा ’ हा लेख वाचून केळकर स्वतःच मराठीचे व्याकरण का लिहीत नाहीत ? त्यांनी ते लिहायला पाहिजे—असे कोणत्याही वाचकाला वाटेल ‘ मराठीचे श्रवणप्रत्ययी लेखन ’ आणि ‘ मराठी देवनागरी वर्णक्रमी ’ हे लेख नुसते वाचून विसरून जाण्यासारखे नाहीत. त्यांचा वापर मराठी अभ्यासकांनी करून पाहण्यासारखा आहे.

वैखरीच्या अखेरच्या भागात केळकरांच्या समग्र लेखनाची सूची आहे आणि निर्देश सूचीही आहे. या दोन्ही सूची सभ्यासकांना उपयुक्त आहेत. काही लेखांच्या शेवटी संदर्भसूचीही आहे. मात्र केळकरांनी लेखन केलेल्या विषयांवर इंग्रजीत आणि मराठीत इतर विद्वानांनी केलेल्या लेखनाची एक स्वतंत्र सूची केळकरांनी दिली असती तर बरे झाले असते. खरे म्हणजे मराठीच्या भाषाविषयक संशोधनाचा आढावा घेणारा एक स्वतंत्र लेखच या पुस्तकात हवा होता.

केळकरांचे लेखन हे अवघड असते असा एक मतप्रवाह आहे. त्याचा येथे मुद्दाम विचार करायला हवा. केळकरांच्याच भूमिकेतून विचार करायचा तर दोन्ही बाजू पाहायला हव्यात. मराठी वाचकाला वैचारिक लेखन वाचण्याची सवय कमीच आणि मराठीत जेव्हा ‘ हलक्या फुलक्या शैलीत ’ किंवा ‘ हसत खेळत ’ वैचारिक लेखन होते तेव्हा बहुधा त्यातील विचाराचा भाग अपरिपक्व असतो. शब्दबंबाळ पण विचारात पोचट असे लेखन मराठी माणूस ‘ थोर ’ मानून बाजूला ठेवतो. फार तर

त्याची न वाचता स्तुती करतो. मराठीतील काही वैचारिक लेखन चटपटीत असते पण हा चटपटीतपणा त्याच्या एकारलेपणाचा, प्रचारकी थाटाचा आणि आक्रस्ताळेपणाचा भाग असतो. केळकरांचे लेखन विचारांच्या दृष्टीने पक्के, विज्ञाननिष्ठ आणि मूलगामी आहे. त्यांचा विचार समग्र आहे, कप्प्याकप्प्याचा नाही. भाषेखेरीज इतिहास, तत्त्वज्ञान, संगीत, नृत्य, साहित्य, विज्ञान यांचाही अभ्यास त्यांनी केलेला दिसतो. उदाहरणार्थ, भाषावैज्ञानिक संशोधनातील प्रायोगिक पाहणीची चर्चा करताना ते सहजपणे मनोविज्ञानातील प्रयोगांशी तिची तुलना करतात. वैचारिक लेखन यामुळे थोडेसे अवघड होणे अपरिहार्य आहे. कादंबरीचे वाचन आणि वैचारिक लेखनाचे वाचन या दोन गोष्टी भिन्न आहेत. केळकरांनी 'वैखरी' जरी सामान्य वाचकांसाठी लिहिले असले तरी मराठीचा बहुसंख्य वाचक वर्ग हा साहित्यवाचनावर पोसलेला असल्यामुळे वैखरी वाचणे त्याला जरा कष्टाचेच जाणार. हा झाला लेखकाच्या बाजूचा विचार.

वाचकाच्या बाजूने 'वैखरी'चा विचार केल्यास काय दिसते? केळकरांची शैली तशी सोपी नाही. आणि मुख्य म्हणजे ती एकजिनसी नाही. तुळणे, निरखणे, त्रिभंगणे यासारखे नवीन शब्द ते वापरतात, सांस्कृतिकताप्रवण, सामाजिकताप्रवण, उपयुक्तताप्रवण (पृ. ८४), संदर्भपोषण (पृ. १९४) यासारखे अनेक भारदस्त शब्द ते वापरतात पण यातून कधीकधी 'सामग्र्याने विचार करणे' (पृ. १५१) सारखा खटकणारा प्रयोगही निर्माण होतो. आपल्या संस्कृतनिष्ठ भारदस्त शब्दांचे वर्चस्व कमी करण्यासाठी केळकर कधीकधी त्याला बोलीभाषेची फोडणी देतात. एकोणिसच्या ऐवजी एकुणिस शब्द वापरून लेखन अधिक नवीन करण्याचा प्रयत्न, तर त्याला जुनेपणाचा वास नकळत येतो तो 'मंडळी' सारख्या शब्दांनी. तीच गोष्ट 'भाषिक समस्या' आणि भाषिक फट (पृ. ८२) यांच्या संगतीची डकवलेली लेबले, चक्क असे काही अनौपचारिक शब्द वापरून लेखन सुसह्य होते अशी यामागची कल्पना दिसते. पण ही सरमिसळ असते; त्याला एकजीवता नसते. केळकरांच्या वाक्यरचनेत हे विशेषत्वाने जाणवते.

'यांचा परिणाम अनेकदा विद्यार्थ्यांच्या मनावर असा होतो की संस्कृतच्या वाटेल पुन्हा कधी जायचे नाही असे त्यांच्या मनावर पक्के ठसावे!' (पृ. २२१)

यासारख्या बोजड,

'भारताच्या भाषांबद्दलचे प्रश्न म्हणून विचार करू लागले की...' (पृ. १०३)

यासारख्या अस्पष्ट,

'...मनातही येत नाही की आपापल्या पूजनीय भाषापरिवाराबाहेरच्या एखाद्या भाषेचा अभ्यास करावा' (पृ. ५५)

यासारख्या इंग्रजी वळणाच्या वाक्यरचना 'वैखरी'त खूप आहेत. याला उतारा

म्हणून मग केळकर अगदी अनौपचारिक शैलीतील वाक्यरचना करतात.

'तात्त्विक आदर्शाकडून आपण वर्तमान वास्तवाच्या भूतलावर उतरू' (पृ. १२१) (हा अनौपचारिकपणा जुन्या मराठीचा)

'या वाक्याला चक्क दोन अर्थ आहेत' (पृ. १६०)

'गंमत अशी आहे की...' (पृ. १६२)

'शेवटी म्हणजे प्रादेशिक जीवनाचा अभ्यास' (पृ. २००) कधी तर ही सरमिसळ एकाच वाक्यात होते.

'...पर्यायांच्या शक्यता कुठकुठे दिसतात.' (पृ. १९२) ही सर्व उदाहरणे सहजपणे टिपलेली आणि नमुन्यादाखल. एकजिनसी, एकजीव शैलीचा वापर केळकरांनी कटाक्षाने केला तर हे लेखन अधिक वाचनीय ठरेल. अर्थात समीक्षकाची शैली, त्याच्या शैलीविषयक अपेक्षा आणि लेखकाची शैली यांचा मेळ क्वचितच बसतो. पण शैलीबाबतच्या वरील विधानात 'वैखरी' सारखे चांगले वैचारिक लेखन जास्तीतजास्त वाचकप्रिय व्हावे एवढाच हेतू आहे.

**भाषाविज्ञान विभाग, डेकन कॉलेज, पुणे ४११००६**

---

**घटत्या फळाचा सिद्धांत आणि टेलिफोन**

तुमच्याकडे एक टेलिफोन असणे याचे नाव सोय. दोन असणे याचे नाव चैन. तीन असणे याचे नाव आलीशानी. आणि एकही नसणे म्हणजे तर नंदनवनच.

**डग लार्सन, प्रेस गॅझेट**

---

## चुकीची दुरुस्ती

भाषा आणि जीवन, १ : १, संपादकीय, पृ. १ वर ऋग्वेदातील अवतरण ( १० : ७१ : ४ ) संस्कृतमध्ये विशिष्ट वैदिक लिपिचिन्हे वगळून दिले आहे आणि नंतर त्याचा मराठीत अर्थ दिला आहे. हा क्रमातील अनुवाद पुरेसा अचूक नाही. तो असा वाचावा.

( नेणता असतो ) तो वाणीला पाहतो पण पाहतच नाही, तो ऐकतो पण ऐकतच नाही, ( जाणता असतो ) त्याच्यापुढे ( मात्र ) वाणी आपली तनु संपूर्ण प्रकट करते, जशी उत्तम वस्त्र ल्यालेली संगमोत्सुक अशी पत्नी पतीच्यापुढे.

## भेटीचा साभार स्वीकार

The Satara District Bar Association, Law Seminar, Satara 1981, Souvenir. Satara : Souvenir Committee of the Association, 1981. ( इंग्लिश व मराठी लेख ).

मिलिंद येरमाळकर. अस्तित्व. लातूर : राष्ट्रभूषण प्रकाशन, १९८३. (पाच वैचारिक लेख, दलित व नवबौद्ध चळवळीचा संदर्भ. )

वसंत दत्तात्रेय गुर्जर. गांधी मला भेटला. मुंबई: प्रास प्रकाशन, १९८३. ( भित्तिपत्रक-कविता ).

Madhukar N. Gogte. Spelling reforms : An Indian viewpoint. Bombay, 1983. ( Duplicated article ).

## परिषदेच्या सभासदांसाठी थोडेसे

पत्रिकेच्या पहिल्या अंकाचे स्वरूप पाहून अनेकांनी बरीच अनुकूल प्रतिक्रिया व्यक्त केली खरी, पण त्याचबरोबर काहींनी तिची किंमत अंमळ जास्त असल्याचे म्हटले, तर काहींनी तिची काया जरा जास्तच सडपातळ असल्याचा निर्वाळा दिला ! आता हे तितकेसे खरे नाही. सुटा अंक घेणाराला किंवा संस्थेला अंकामागे १० रुपये पडत असले तरी परिषदेच्या सभासदांना यापेक्षा कमी पैसे पडतील. शिवाय त्या पैशात परिषदेची सभासदत्वाची वर्गणीही समाविष्ट आहे.

दुसरे म्हणजे अशा नियतकालिकाचे एक अर्थकारण असते. वर्गणीदारांची संख्या वाढली, जाहिराती सतत मिळत गेल्या, काही कायम निधी जमू शकला तर पत्रिकेला आर्थिक स्थैर्य येईल. मग लेखकांचा सहभाग मिळेल तसा पत्रिकेची पाने थोडी वाढा वण्याचाही विचार अवश्य करता येईल. परिषदेच्या सभासदांनी ही आपली पत्रिका आहे असे मानले तर हे सगळे साधून छपाई, कागद, टपाल यांच्या वाढलेल्य दरांवर मात करणे अवघड नाही.

या अंकासाठी मुद्दाम मागून घेतलेला काही मजकूर अंकात घालता आला नाही याबद्दल संबंधित मंडळी उदार मनाने ही सध्याची अडचण लक्षात घेतील अशी आशा आहे.

पत्रिका वाचून संपवताना ती आणखी मोठी पाहिजे होती असे वाचकांना वाटते आहे ही गोष्ट मात्र संपादनसमितीला निश्चित दिलासा देणारी आहे! काही वाचकांनी पत्रिकेच्या स्वरूपाबद्दल उपयुक्त सूचना केल्या आहेत ही गोष्ट देखील त्यांनी पत्रिकेला आपली मानल्याची खूण आहे. लोभ आहेच, वृद्धी असावी.

परिषदेचे सभासद होणे ज्यांना कदाचित आवडेल किंवा पत्रिकेला जाहिरात देणे ज्यांना शक्य होईल. अशा मंडळींची नावे आणि पत्ते कळवावे म्हणजे त्यांना नमुना अंक आणि आवाहन पाठवता येईल.

## लेखकांसाठी सूचना

**भाषा आणि जीवन १ : १, जून १९८३, पृ. २५ पहा.**

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. मनीऑर्डरने किंवा चेकने पैसे पाठविल्यास ते प्रा. प्र. ना. परांजपे, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, १।८ आगरकरनगर, पुणे ४११००१ या पत्त्यावर पाठवावे. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास तसा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रु. बटणावळ म्हणून भर घालावे. पावती मागाहून पाठवली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत, १९८४ पासून वर्षाला चार अंक निघतील

| | १९८३ साठी | १९८४ साठी |
|---|---|---|
| परिषदेचे सामान्य सभासद (सभासद–वर्गणी धरून) | १५ रु. | ३० रु. |
| इतर व्यक्ती आणि संस्था वर्गणीदार | २० रु. | ४० रु. |

सुट्या अंकाला १० रु.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५०रु., शुभेच्छासूचन १००रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठी असल्यास उत्तम.

अनुक्रमणिका